# पराभव

(एक अभिनव सामाजिक कादंबरी)


– लेखक –

श्री. वि. वि. बापट,

( माजी सहसंपादक 'लोकशक्ती' )






७४९ सदाशिव, पुणें २.


किंमत २ रुपये.

— प्रकाशक —
विष्णु विश्वनाथ बापट,
'छाया-प्रकाश' प्रकाशनाकरितां
७४९ सदाशिव,
पुणें २.

— संपादक —
वि. वि. बापट,
मनोहर रानडे,
'छाया-प्रकाश'
पुणे २.



आश्रयदात्यांस हे वर्ष सुखाचें जावो.

आगामी प्रकाशन

# 'आकाशांतील देव'

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

— मुद्रक —
धाकुजी मुकुंद जोगळ,
अशोक प्रिंटिंग प्रेस,
५७० शनवार, पुणें २.

# प्रास्ताविक !

माझी ही पहिलीच कादंबरी वाचकांच्या हातीं देतांना मला अत्यानंद होत आहे. ही कादंबरी लिहिण्याची कल्पना मला प्रख्यात पाश्चात्य लेखिका **उर्सुला ब्लूम** हिच्या **'अवर लेडी ऑफ दी मार्बल'** या कादंबरी-वरून सुचली आणि माझ्या कादंबरींतील जगन्नाथ, प्रभाकर व विनोदिनी या तीन भूमिका मी त्या कादंबरीतील इलियट, पीटर व व्हिरोनिका यांच्या स्वभावचित्रावरून रंगविल्या आहेत. एवढ्याखेरीज बाकीचा सर्व भाग स्वतंत्र आहे. 'माझं बाळ' या श्री. वि. स. खांडेकर यांच्या बोलपट-कथेशीं या कादंबरीचा संबंध कोणाला जोडण्याची इच्छा झालीच तर त्यांच्याकरितां वरील खुलासा पुरेसा आहे असें मला वाटतें.

पांढरपेशा समाजात कुमारी मातांचा प्रश्न दिवसेंदिवस जास्त उग्र स्वरूप धारण करीत आहे. या प्रश्नाच्या मुळाशीं पांढरपेशा समाजाची जी आर्थिक विपन्नावस्था आहे, ती दूर झाल्याखेरीज हा प्रश्न सर्वस्वी सुटणार नाहीं. कुमारिकांच्या मातृत्वाचें समर्थन करून, त्यांना समाजांत मानाचें स्थान प्राप्त करून द्यावे असा अट्टाहास कोणताही सूज्ञ धरणारा नाहीं; पण त्याच-बरोबर त्याच्याकडे तिरस्काराच्या व हेटाळणीच्या दृष्टीनें पाहून हा प्रश्न सुटण्याऐवजीं तो अधिकच चिघळेल यांत तिळमात्र शंका नाहीं. समाजांत गोष्टी कशा घडत आहेत याचें चित्रण करण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. तो कितपत यशस्वी झाला आहे हें वाचकांनीं ठरवावयाचें आहे. असो.

माझी ही पहिलीच कादंबरी प्रकाशित करण्याच्या कामीं मला माझे परम मित्र श्री. मनोहर रानडे यांची बहुमोल मदत झाली आहे. त्याच-प्रमाणे कादंबरीचें हस्तलिखित वाचून मला कांहीं विधायक सूचना केल्या-बद्दल माझे मित्र श्री. आबासाहेब केळकर वकील यांचाही मी आभारी आहे. अशोक प्रिंटिंग प्रेसचे मालक, मॅनेजर दादासाहेब मिराशी यांची जर

मदत झाली नसती, तर ही कादंबरी प्रकाशितच झाली नसती. तसेंच त्याच्या छापखान्यांतील श्री. यंदे, श्री. कुलकर्णी, श्री. काटे प्रभृतींनीं ज्या आपुलकीनें या कादंबरीचें काम उरकलें त्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

माझ्या विनंतीला मान देऊन जाहिराती दिल्याबद्दल मागोरा केमिकल्स लि. चे श्री. दादासाहेब रानडे, अशोक टी कंपनी, वसंत इन्शुअरन्स कं. लि., इंडियन असोशिएटेड केमिकल्स लि. चे श्री. रा. न. अभ्यंकर, त्याचप्रमाणें चित्रकार श्री. एम्. डी. कुलकर्णी आणि ब्लॉकमेकर्स मेसर्स के. जोशी यांचेही आभार मानणें आवश्यक आहे.

वि. वि. बापट.

---

# पराभव

— १ —

जमखिंडीच्या बाजूला बाबासाहेब इनामदारांचें घराणें म्हणजे केवढें प्रख्यात होतें. आज बाबासाहेब हयात नव्हते. त्यांच्या पाठीमागें त्यांची विधवा पत्नी माईसाहेब व जगन्नाथ–प्रभाकर हे दोघे मुलगे होते. नाहीं म्हटलें तरी, बाबासाहेबांचें वार्षिक उत्पन्न २५ हजार रुपयांच्यावर सहज असावें.

भर एप्रिल महिन्यांतील दिवस होते. त्यांतून तो कर्नाटकांतील उन्हाळा, मग आंगांतून एकसारख्या घामाच्या धारा निघत असल्यास आश्चर्य कसलें! अशाच एका दुपारीं आपल्या तिमजली वाड्यांतील खोलींत पंख्यानें वारा घेत जगन्नाथ कोचावर बसला होता. जगन्नाथाचें वय सुमारें २२–२३ वर्षांचें असें. उंच पण सडपातळ बांधा, डोळ्यांत बुद्धीची चमक व बाबासाहेबांच्या मृत्युमुळें त्याच्यावर इनामदार घराण्याची पडलेली जबाबदारी. यामुळें त्याच्या चेहेऱ्यावर आलेला किंचितसा अकालीं पोरकेपणा, या सर्वांमुळें तो वैशिष्ट्यपूर्ण दिसत असे. बाबासाहेबांच्या मृत्युमुळें त्याला बी. ए. झाल्यावर आपला शिक्षणक्रम सोडून घरीं यावें लागलें होते. बुद्धीच्या झालेल्या या कोंडमाऱ्यामुळें त्याच्या चेहेऱ्यावर एक प्रकारचें नैराश्यही दिसत असे.

आज त्यांत त्याला आणखी आपला धाकटा भाऊ प्रभाकर याच्याविरुद्ध आलेल्या कागाळीनें आणखीच बेचैन करून सोडलें होते. प्रभाकर

सांगलीला विलिंग्डन कॉलेजमध्यें शिकत होता. पण अभ्यासांतील हुशारीऐवजीं त्याची बुद्धी इतर बाबतींतच जास्त चाले. जगन्नाथाला नेमकें हेंच सहन होत नसे. आपण इनामदार घराण्यांतले— आपला नांवलौकिक केवढा — या कल्पनांनीं त्याला सारें जग तुच्छ वाटत असे. जगांत सर्व साधुच असावेत — सैतान नसावेत — अशीच त्याची आकांक्षा होती, आणि याच दृष्टीकोनांतून तो प्रभाकरकडे पहात असे.

जगन्नाथ प्रभाकरच्या आगमनाची वाटच पहात होता. आज काय तो सोक्षमोक्ष लावून टाकावयाचा, असा जगन्नाथनें आपल्या मनाशीं निश्चय केला होता. आणि म्हणून प्रभाकर आल्याबरोबर त्यानें एकदम मूळ विषयालाच हात घातला. 'प्रभाकर,' जगन्नाथनें सुरुवात केली, "तुझ्याविरुद्ध आलेली आजची कागाळी आपल्या घराण्याच्या किर्तीला काळिमा फासणारी आहे. तूं आपल्या मित्रांबरोबर एका नर्तकीच्या घरीं नाचगाण्यास गेलास हें बरें नव्हे!" जगन्नाथाप्रमाणेंच प्रभाकरानेंही आज सर्वच बाबतींत सोक्षमोक्ष करण्याचें ठरविलें होतें. तो एकदम उसळून म्हणाला, "जिथें तिथें तुला स्वत्त्व, घराण्याची किर्ती, अब्रू यांच्याशिवाय दुसरें कांहीं दिसतच नाहीं. साधना नर्तकीच्या घरीं मीं गेलों होतों, ही गोष्ट अक्षरशः खरी आहे, आणि त्याबद्दल मी प्रिन्सिपॉलची माफी मागावयास मुळींच तयार नाहीं. मग जें कांहीं व्हावयाचें असेल तें होवो !"

प्रभाकरच्या या तडकाफडकीं उत्तरानें जगन्नाथला फारच आश्चर्य वाटलें. आपला भाऊ इतका उर्मट झाला असेल, याची त्याला कल्पनाही नव्हती. तथापि, आपला उसळणारा राग त्यानें आवरून धरला. प्रभाकरला कॉलेजमधून काढून टाकण्यांत आलें ही गोष्ट आपली इभ्रत, आपला लौकिक यांना कमीपणा आणणारी आहे असें

त्याला राहून राहून वाटे. शेवटीं याबाबतींत त्यानें कॉलेजच्या प्रिन्सिपॉलला पत्र लिहून प्रभाकरला एकवेळ क्षमा करण्याची विनंती केली.

× × × ×

चारच दिवसांनीं कॉलेजच्या प्रिन्सिपॉलकडून उत्तर आलें. त्यांनीं प्रभाकरनें स्वतः लेखी माफी मागितल्याशिवाय हें प्रकरण मिटणार नाहीं, असें स्पष्ट शब्दांत लिहिलें होतें. प्रिन्सिपॉलचें पत्र हातांत घेऊन जगन्नाथ क्षुब्ध मनःस्थितींत आपल्या खोलींत एकसारख्या येरझारा घालत होता. थोड्याच वेळांत प्रभाकर येऊन दाखल झाला. प्रभाकरला पहातांच, आपला उसळणारा राग आवरून जगन्नाथ म्हणाला, "प्रभाकर, तुला लेखी माफी मागितलीच पाहिजे. आपलें घराणें, मी मिळविलेला नांवलौकिक याचा तूं कांहींच विचार करीत नाहींस. तुला आपला स्वार्थ तेवढाच दिसतो!"

"आणि तुलाहि तुझ्याशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं!" प्रभाकर गुरगुरला. "तुझ्या मनाचा अकुंचितपणा मी केव्हांच ओळखला आहे. स्वतःशिवाय तुला कांहीं दिसत नाहीं. साधना नर्तकीच्या घरीं मी गेलों हें तुझ्या दृष्टीनें पाप झालें. कबूल आहे मला, पण मनुष्याला जोंपर्यंत मोह पडला नाहीं, तोंपर्यंतच त्यानें साधुत्वाच्या गप्पा माराव्यात. एक दिवस तुझ्या आयुष्यांत असा येईल कीं पापांत-सुद्धां पुण्य असतें, पापी गणला गेलेला मनुष्य एकाद्या पुण्यात्म्या-पेक्षांही श्रेष्ठ असतो याची प्रचिती तुला येईल. रूढ कल्पनांनी जी गोष्ट आज पाप म्हणून गणली जात आहे, ती वास्तविक पुण्य आहे हें तुला पटेल. मी कॉलेजांतून जावयास तयार आहे. प्राण गेला तरी मी माफी मागणार नाहीं. ज्या घराण्याच्या लौकिकाकरतां, स्वतःच्या खोट्या मोठेपणाकरतां तूं माझा अपमान केलास तो घराण्याचा लौकिक, तो तुझा मोठेपणा या सर्वांना माझा अखेरचा रामराम!"

बाहेर जातांना प्रभाकरानें धाडदिशी लावलेल्या दाराच्या

आवाजानें जगन्नाथच्या अस्वस्थतेंत आणखी एकदी भर पडली. आपण केलें तें बरोबर कीं चूक याचा निर्णय त्याचा त्यालाच देतां येईना. अशा द्विधा मन:स्थितींतच तो उठून खालीं गेला.

दुसऱ्याच दिवशीं प्रभाकर कोणाचाही निरोप न घेतां मुंबईला निघून गेला. अगोदरच हळव्या झालेल्या माईसाहेबांच्या मनावर हा मोठाच आघात होता. जगन्नाथाइतकें त्यांना प्रभाकराबद्दल आकर्षण नव्हतें. त्यांच्या मातृहृदयांत प्रभाकरापेक्षां जगन्नाथावरील प्रेमालाच जास्त जागा दिली गेली होती. तथापि, ती किती झालें तरी एक माता होती! मुलाच्या वियोगानें तिच्या डोळ्यांत चटकन् पाणी आलें. आपल्या पतीच्या नांवलौकिकाला—घराण्याच्या मोठेपणाला—प्रभाकरनें काळिमा फासला, हें जगन्नाथाचें म्हणणें त्यांनाही पटलें. प्रभाकर अचानक निघून न जाता, तर त्यांनीं त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला असतां. माईसाहेबानीं लहानपणापासून लालनपालन केलेल्या विनोदिनीलाही जगन्नाथची वर्तणूक पसंत पडली नाहीं. तिला दोघाही भावांबद्दल सारखीच आस्था वाटत होती; पण तिचें खरें प्रेम होतें जगन्नाथावरच! जगन्नाथाशींच तिचा विवाह व्हावा अशी माईसाहेबांचीही इच्छा होती. आणि आपल्या समजुतीप्रमाणें त्या त्यांच्या प्रेमाच्या रोपट्याला आपल्या सहानुभूतीचें पाणी घालत होत्या.

प्रभाकर मुंबईला निघून गेल्याला आतां एक महिना झाला होता. माईसाहेबांनांही आपल्या दु:खाचा थोडासा विसर पडला होता. जगन्नाथाच्या मनांतून प्रभाकर विषयींच्या विचारांनीं केव्हाच उच्चाटन केलें होतें. विनोदिनीलामात्र प्रभाकराची वरचेवर आठवण येई.

अशाच एका सायंकाळीं विनोदिनी बागेंतून फिरत होती. वरच्या दिवाणखान्यांत माईसाहेब व जगन्नाथ तिच्याविषयींच बोलत होते.

'तुला माहित आहे जगन्नाथ,' माईसाहेबांनीं सुरुवात केली. तुझा

आणि विनोदिनीचा विवाह व्हावा अशी माझी मनापासून इच्छा आहे. ती केव्हां पुरी होईल ती होवो. मात्र जितक्या लौकर माझी इच्छा पुरी होईल तितकें बरें !"

माईसाहेबांनीं आपला हा विचार आजच बोलून दाखविला नव्हता. पण जगन्नाथनें विनोदिनीबद्दल या दृष्टीनें कधींच विचार केला नव्हता. त्यानें सहज खिडकींतून डोकावून बागेंत पाहिलें. झाडावरचीं फुलें तोडतांना विनोदिनीच्या लांबसडक बोटांची होणारी मोहक हालचाल, तिनें नेसलेल्या पांढऱ्या शुभ्र पातळांतून व्यक्त होणारा तिच्या शरीराचा बांधेसूदपणा, या सर्वांत जगन्नाथला माई-साहेबांच्या बोलण्यानें नाविन्य वाटूं लागलें. आणि म्हणूनच तो म्हणाला, " तुझी इच्छा अपुरी रहाण्यास मला तरी कांहीं कारण दिसत नाहीं. विनोदिनीचा पत्नी म्हणून स्वीकार करावयास माझी तयारी आहे. " जगन्नाथाच्या या आश्वासनामुळें माईसाहेबांना बरें वाटलें. त्या आणखीं कांहीं बोलणार इतक्यांत हातांत गुलाबांच्या फुलांचा एक झुबका घेऊन विनोदिनीच आंत आली. बागेंत बराच वेळ फिरल्यामुळें तिचा चेहेरा आरक्त झाला होता. अधिक मोहक कोण? तिचा गोड चेहेरा कीं तिच्या हातांतील गुलाबाचीं फुलें, असा विचार जगन्नाथाच्या मनांत आल्यावाचून राहिला नाहीं.

— २ —

दिवसामागून दिवस जात होते. मुंबईला गेल्यापासून प्रभाकरचें कांहींच वर्तमान कळलें नव्हतें. तथापि; त्याबद्दल कुणाला फारसें वाईटही वाटत नव्हतें. जगन्नाथ राहून राहून स्वतःबद्दल आणि विनोदिनीबद्दलच विचार करण्यांत गुंग असे. विनोदिनी ही आपल्याला अनुरुप पत्नी आहे आणि तिच्याशीं विवाह करावयास आपल्याला कांहींच हरकत नाहीं, असा विचारांतीं त्याचा ठाम निश्चय ठरला,

आणि म्हणूनच विनोदिनीचा विचार काय आहे हें समजून घेण्याचें त्यानें ठरविलें.

एके दिवशीं दुपारीं चहा झाल्यावर त्यानें विनोदिनीला आपल्या खोलींत बोलावणें पाठविलें, व दोघांच्याही विचारानें सायंकाळीं नदीकाठीं फिरावयास जावयाचें ठरवून, त्याप्रमाणें ते फिरावयास गेलें. नदीकाठीं एका स्वच्छशा जागेवर बसल्यावर जगन्नाथानेंच विषयाला सुरुवात केली. 'विनोदिनी'—तो म्हणाला, "आईची इच्छा काय आहे हे तुला माहित आहेच. माझ्या मनांतील विचारही तुला माहित आहेतच. आणि म्हणूनच मला तुझें मत कळावें अशी इच्छा आहे." जगन्नाथ कडून आपल्याला हा प्रश्न केव्हां तरी विचारला जाणारच, याची विनोदिनीला कल्पना होती. तथापिही, तिच्या चेहेऱ्यावर एक प्रकारची आरक्ति चढली. संध्याप्रकाशांत तिचा चेहेरा जगन्नाथला अधिकच मोहनीय वाटला. तिनें मानखाली घातली होती, तरी डोळ्यांची मूकभाषा तिच्या चेहेऱ्यावर पूर्णपणें उमटली होती. त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला. रेशमासारख्या तिच्या मऊ हाताच्या स्पर्शानें त्याला एकप्रकारचा अननुभूत आनंद प्राप्त झाला होता. तारुण्यसुलभ भितीनें तिची छाती धडधडत होती, आणि त्यामुळें तिच्या उन्नत वक्षस्थळाची होणारी हालचाल त्याला अतिशय मोहक वाटत होती. जगन्नाथचें आपल्यावर खेरंखुरें प्रेम आहे म्हणून, कीं केवळ माईसाहेबांच्या इच्छेला मान देण्याकरतां तो आपल्याशीं विवाह करूं इच्छित आहे, हें समजून घेण्याकरतां विनोदिनी म्हणाली, " जगन्नाथ माझ्याशीं तूं विवाह करावयास तयार आहेस. तो माझ्यावरील खऱ्याखुऱ्या प्रेमामुळें कीं माईसाहेबांच्या इच्छेला मान देण्याकरितां—मातेच्या बाबतींतील आपलें कर्तव्य पार पाडण्याकरितां ? तुझ्या घराण्याचा मोठेपणा तर मध्येंच आड येणार नाहींना ? "

घराण्याचा मोठेंपणा हे शब्द ऐकल्याबरोबर जगन्नाथचें मन कांहीं क्षणच अस्वस्थ झालें. किती झालें तरी विनोदिनी आपल्या घरीं पाळलेली एक अनाथ मुलगी, तिच्याशीं लग्न करण्यानें आपल्या मोठेपणाला कमीपणा तर येणार नाहीं? आपल्या मनांतील या विचारांना वाट करून देण्याकरितां म्हणून जगन्नाथनें दुसराच विषय काढला. पाप आणि पुण्य, हाच तो विषय होता. 'पुण्य म्हणून समजली जाणारी एखादी गोष्ट पापमय असूं शकते—पाप हेहीं केव्हां केव्हां पुण्यच असते' असे तिचे विचार ऐकून तर जगन्नाथ क्षणभर चमकलाच! याबाबतींत प्रभाकराच्या आणि तिच्या विचारांत इतकें साम्य असल्याचें बघून त्याला आश्चर्य वाटलें. पुन्हां विषय बदलण्याकरतां म्हणून तो म्हणाला, "विनोदिनी त्याच्याशीं आपल्याला कांहींच कर्तव्य नाहीं. तूं पूर्ण विचार करून काय तें मला सांग. वमुलाच्या कांहीं कामाकरतां मी पंधरा दिवस गांवाला जाणार आहे आणि मला वाटतें, तुला विचार करावयास एवढा अवधी पुरेसा आहे." त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला आणि त्याबरोबर त्याच्या शरिरांतून एकप्रकारची गोड चमक निघून गेल्यासारखें त्याला वाटलें. आपण करतों आहोंत हें पाप कीं पुण्य, असा विचार मनांत येण्यापूर्वीच तिचें चुंबन घेण्याचा त्यानें विचारही केला, पण तेवढ्यांतच त्यानें आपलें मन आवरलें. दोघेंही उठून घरीं गेलीं.

× × × ×

राहून राहून जगन्नाथला आदल्या दिवशींच्या प्रसंगांचें आश्चर्य वाटत होतें. विनोदिनी त्याची भावी पत्नी होती. माईसाहेबांना तसें त्यानें वचनही दिलें होतें आणि असें असूनही तिचें चुंबन घेण्याची इच्छा होऊन पुन्हा मन आवरल्यावर त्याला आपल्या मनांत हा विचार कसा काय आला या विचारानें त्याचा मनस्ताप

झाला होता. दुसऱ्याच्या पापाची येतां जातां उठावणी करून त्यांना डिवचणारें आपलें मन मोहाच्या इतकें कसें आहारीं जाऊं पहात होतें, या विचारानें त्याला बेचैन केलें. प्रभाकरचे शब्द तापलेल्या तेलाप्रमाणें त्याच्या कानांत सळसळून गेले. मोह ! स्त्री ! ! तारुण्य ! ! ! किती अनर्थ केला आहे या तीन गोष्टींनीं जगांत ! सीतेला आपली भोगदासी करण्याची अभिलाषा बाळगणारा दशानन अखेर श्रीरामचंद्राच्या हातून मारला गेला ! मोहिनीकरतां सुदोपसुंद लढतां लढतां मेले ! तालिकोटचें साम्राज्य एका स्त्रीपायींच धुळीस मिळालें ! फार काय, आपल्या गांवांतील सख्या महाराचा खून झाला तोही दुसऱ्याच्या स्त्रीवर हात टाकण्याच्या झगड्यावरून ! स्त्री ही केवढी अनर्थकारी शक्ती आहे ! हां हां म्हणतां, तिच्याकरितां मित्राचे कट्टे दुष्मन बनतात, आणि एकमेकांचे गळे कापतात. त्यापेक्षां स्त्री ही जगांतच नसती तर ? या सर्व विचारांनीं जगन्नाथचें मस्तक अगदीं सुन्न होऊन गेलें. पुन्हा त्याला विनोदिनीची आठवण झाली. तिच्या सौंदर्यावर तो बेहद्द खूष होता. पण, आपण तिच्याशीं लग्न करणार तें ती आपल्याला आवडते म्हणून, कीं माईसाहेबांची तशी इच्छा आहे म्हणून ? प्रेमाकरतां कीं कर्तव्याकरतां ? खरोखरच तसें पाहिलें तर जगन्नाथच्या मनांत विनोदिनीवरील प्रेमाइतकीच माईसाहेबांच्या इच्छेला मान देण्याची कर्तव्यबुद्धीही तितकीच जागृत होती. स्वत:बद्दल असलेल्या कांहीं कल्पनांनीं त्याच्या मनाची अशी विचित्र ठेवण होऊन बसली होती कीं, त्याबद्दल त्याचें त्यालाही कधीं कधीं आश्चर्य वाटे !

जगन्नाथच्या विचारांचा प्रवाह आणखी कोणीकडे वाहवला असता कुणास ठाऊक; पण इतक्यांत एका नोकरानें गांवांतील वृद्धकाका आपणांस भेटावयास आल्याचें सांगतांक्षणींच तो आपल्या विचारांच्या तंद्रींतून जागा झाला. समोरच्याच दरवाज्यांतून वृद्ध-

काका धीर-गंभीर पावलें टाकीत येतांना त्याला दिसले. मूर्तीमंत निराशा, दु:ख व एकप्रकारच्या सात्त्विक संतापाच्या भावना त्यांच्या चेहेऱ्यावर स्पष्टपणें त्याला दिसल्या. जगन्नाथनें त्यांना एका खुर्चीवर बसावयास सांगितलें. वृद्धकाकांना आपल्याकडे येण्याचें कारण काय? याचा विचार करण्यापूर्वीच काकांनीं सुरुवात केली, ' जगन्नाथराव ' त्यांच्या आवाजांत एक प्रकारचा कंप निर्माण झाला होता. छाती धडधडत होती. आपण यांना आपलें गाऱ्हाणें सांगत आहों खरें, पण त्याचा कांहीं उपयोग होईल किंवा नाहीं, अशा शंकेनें त्यांच्या स्वरांत एकप्रकारची भयाकुलता होती. तथापि; धीर करून ते म्हणाले, " तुम्हाला माहित आहेच. मला मालती नांवाची एक मुलगी आहे. ती तरुण आहे, दिसायलाही नाकींडोळीं चांगली आहे आणि या चांगुलपणानेंच तिच्या कौमार्याचा बळी घेतला गेला आहे. तिच्या हातून होऊं नये ती गोष्ट झाली आहे. सारा गांव मला खावयास उठला आहे, आणि तुमच्यासारख्यांनीं माझ्यावर—माझ्या मालतीवर—दया केली नाहीं तर आम्हा दोघानांही आत्महत्त्या करण्याशिवाय गत्यंतर नाहीं." काकांच्या म्हणण्याचा आशय काय याची थोडीशी अंधुक कल्पना आतां जगन्नाथला आली. मालतीनें पाप केलें होतें! 'तारुण्यांत—विशेषत: कुमारिकेनें ज्या गोष्टीकरतां आपल्या डोळ्यांत तेल घालून जपावयास पाहिजे, त्या गोष्टीकडे मालतीनें दुर्लक्ष केलें होतें—तिचें पाप तारुण्यसुलभ होतें; पण कितीही झालें तरी तें पाप होतें! पाप झांकून टाकावयास आपण कुणालाही उत्तेजन देतां कामा नये—एका नर्तकीच्या घरीं नाचगाण्यास गेल्याबद्दल आपण आपल्या भावाची कानउघाडणी करावयास कमीं केलें नाहीं. त्यानें प्रत्यक्ष घराचा त्याग केला तरी, आपण आपल्या डोळ्यांतून पाण्याचा टिपूस येऊं दिला नाहीं,—कठोर अंत:करणानें सर्व गोष्टी सहन केल्या. प्रभाकरच्या मानानें मालतीच्या पापाचें पाऊल फारच पुढें पडलें होतें.

तिला क्षमा ? स्त्री असली म्हणून काय झालें ? तिनें आपल्या पापाचें प्राय:श्चित भोगलेंच पाहिजे, असा ठाम निश्चय करून जगन्नाथ म्हणाला, " काका, तुमच्या मालतीनें फार मोठें पाप केलें आहे आणि त्याच्यावर तुम्ही मला पांघरुण घालावयास सांगतां याचें मला आश्चर्य वाटतें. पाप करणारांना त्यांचें पाप छपविण्याचे असे राजरोस मार्ग मोकळे झाले, तर मग कांहीं विचारावयासच नको. मालतीच्या पापाचें प्राय:-श्चित तिनें भोगलेंच पाहिजे ! "

' जगन्नाथराव, ' काका काकुळतीला येऊन म्हणाले,—" तुम्हीच आम्हांला असें दूर लोटलेंत, तर आम्ही कुणाच्या तोंडाकडे पहावयाचें ? मालूनें करूं नये ती गोष्ट केली आहे, पण त्यांत तिचा कांहीं एक-टीचाच दोष नाहीं. तिला पाप करावयास लावणारा तिचा जोडीदार मात्र केव्हांच पसार झाला आहे ! आणि त्या पापाचें ओझें जन्मभर वाळगण्याची,—नव्हे कदाचित त्यापायीं जीव गमाविण्याची पाळीमात्र मालूवर आली आहे. आपण इतके कठोर होऊं नका. कांहींही करा पण मालूला वाचवा. वृद्धावस्थेंत माझ्यावर आलेल्या या भयंकर प्रसंगाकडे तरी पहा !" इतकें बोलून वृद्धकाका एखाद्या लहान मुलाप्रमाणें ओक्साबोक्शीं रडूं लागले. जगन्नाथाच्या हृदयाला त्यांच्या आक्रोशानें पीळ पडला. आपण काकांना जें सुनावलें तें चूक कीं बरोबर, या विचारांच्या द्वंद्वानें त्याच्या मनांत थैमान घातलें. विनोदिनीच्या बाबतींत आपल्यासारख्या कट्टया निग्रही पुरुषालाही एकदां मोह उत्पन्न झाला होता, मग मालू तर बोलून चालून एक तरुण—अल्लड कुमारिका ! तिच्या हांतून न कळत झालेल्या पापाचें प्राय:श्चित तिला घ्यायला लावावयाचें ? कां तर केवळ रूढ कल्पनांनीं ठरविलेल्या पापपुण्याच्या व्याख्येकरतां ? माणुसकीचा अभाव हें पापच नव्हें कां ? राहून राहून त्याला माल-तीच्या सुटकेचा मार्ग स्वीकारावासा वाटे ! पण, शेवटीं त्यानें निश्चय

करून काकांना या बाबतींत आपण कांहींही करूं शकत नाहीं असें सांगितलें. झालें! काकांच्या आशेचा एकच एक धागा होता तोही ताडकन् तुटला ? त्याच्या खचलेल्या मनावर हा मोठाच आघात होता. संताप आणि दु:ख यांच्या संमिश्र भावनांनीं त्यांच्या तोंडांतून शब्द उमटेना. यमाच्या आमंत्रणाचीच केवळ वाट पहात असलेली त्यांची काया रागानें एकसारखीं थरथर कापत होती. संतापलेला ब्राह्मण किती भयंकर असतो, याचा प्रत्यक्ष अनुभव जगन्नाथाला येत होता. शेवटीं मोठ्या कष्टानें काकांनीं आपला संताप आवरला व जातां जातां ते जगन्नाथाला म्हणाले, " जगन्नाथराव मी जातों. आपण माझ्या मालूला क्षमा करण्याचें नाकारलेंत, तिच्याकरतां कांहींही करावयाची आपली तयारी नाहीं; पण, तुम्हांला मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, आज माझ्या मालूवर जो प्रसंग ओढवला आहे, तो उद्यां आपल्या विनोदिनीवर ओढवणार नाहींच अशी खात्री बाळगूं नका. आणि यदाकदाचित विनोदिनीची माझ्या मालूसारखी स्थिति झाली, तर तिला आपण अशी दूर लोटूं नका— तिला क्षमा करा. मोहाचा पुरा पगडा मनुष्यावर बसला नाहीं तोपर्यंतच त्यानें वल्गना कराव्यात. माझ्या या शब्दांची तुम्हांला तुमच्या आयुष्यांत कधीं तरी आठवण येईलच !"

वृद्धकाकांचे हे शब्द जगन्नाथाच्या कानांत तापलेल्या तेलासारखे घुसले ! विशेषत: विनोदिनीबद्दल त्यांनीं जें म्हटलें, तें तर फारच भयंकर होतें ! 'विनोदिनी ! कुमारी माता होण्याचा प्रसंग तिच्यावर ओढवणार ! कांकांनीं हा शाप तर दिला नाहीं ? छे ! भलतीच कांहींतरी कल्पना ! म्हाताऱ्याच्या बडबडीकडे काय लक्ष द्यावयाचें' असें म्हणून जगन्नाथ बसल्या जागेवरून उठला. खालीं जिन्यावर कांकांची जड पावलें आपला मार्ग धीर गंभीर रितीनें आक्रमतांना त्याला ऐकूं येत होतीं ! त्या वृद्धाची मूर्ती, त्याच्या चेहे-

त्यावरची ती मूर्तीमंत निराशा, पुढील भयाण परिणामाच्या जाणिवेनें भिंतीच्या उमटलेल्या छटा जगन्नाथला एकसारख्या डोळ्यापुढें दिसत होत्या. त्याला कांहींकेल्या चैन पडेना, म्हणून तो खालीं जावयास उठला. इतक्यांत त्याला दरवाज्यांत उभी असलेली विनोदिनी दिसली. आपलें संभाषण तिनें ऐकलें तर नाहींना; या विचारानें त्याला अस्वस्थ केलें! विनोदिनी! कुमारी माता! मालतीला प्रायःश्चित पाप! हे शब्द त्याच्या डोक्यांत सारखे! घुंमूं लागले!

— ३ —

मुंबईत आल्यापासून त्या मायावी मोहनगरींतील अनेक बरेवाईट अनुभव प्रभाकराला आले होते. माणसांची ती धांदल, त्यांचें तें यांत्रिकजीवन ही त्याला यापूर्वी त्याच्या शहरवजा खेड्यांत कधींही पहावयास मिळाली नव्हती. जो तो आपल्याच धांदलींत—एखाद्याला वाटावें कीं, या शहरांत इतर गोष्टींकरतां राहो, पण कुणाला मरायलासुद्धां सवड आहे कीं नाहीं? प्रभाकरानें कांदेवाडींतल्या एका इमारतींत शेवटच्या मजल्यावर एक लहानशी खोली भाड्यानें घेऊन तेथें आपला संसार थाटला होता. त्याला लहानपणापासून चित्रकलेचा नाद होता आणि एक दोन प्रदर्शनांतून त्याला बक्षिसेंही मिळालीं होतीं. आणि म्हणूनच नोकरीचा प्रयत्न न करतां आपलें आयुष्य चित्रकलेच्या जोरावर स्वतंत्रतेनें घालवावयाचें त्यानें ठरविलें होतें. ज्या अभिमानानें त्यानें घर सोडलें होतें, त्याच अभिमानानें आपण आपलें आयुष्य व्यतित करावयाचें, पापपुण्याची फारशी कदर करावयाची नाहीं—असा त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला होता.

त्या अनोळखी शहरांत प्रथमतः त्याला कामें मिळविण्यास फारच त्रास पडला. वशिल्याशिवाय मुंबईत एखाद्याला सोनापुरात

स्वतःची चिता पेटण्यापुरतीही जागा मिळावयाची नाहीं असे त्राग्याचें विचार येण्याइतके त्याला तेथील वशिलेबाजीनें संतप्त केलें होतें. कुठेंही जा, वशिल्याशिवाय गोष्ट नाहीं अशी स्थिति होती! तथापि. त्यांच्या आगची कला इतकी अभिजात होती कीं, वशिल्याचे धोंडे-त्यानें लौकरच दूर केले आणि एका सिनेमा कंपनीच्या नवीनच निघणाऱ्या चित्रपटाचे पोस्टर्स रंगविण्याचें काम त्याला मिळालें. सकाळ पासून सायंकाळपर्यंत आपल्या खोलींत काम करावें; सायं-काळीं चौपाटी, नाहींतर हॅंगिंग गार्डनवर मस्त फिरून यावें व रात्रीं करमणुकीदाखल एखादा सिनेमा नाहींतर नाटक पहावें, अशा साच्याचें त्यांचें आयुष्य चाललें होतें. त्यांत त्याला वाईट वाटत नव्हते. भावाच्या नाकावर टिच्चून तो स्वतंत्र जीवन जगत होता. आपण इनामदार घराण्यांतले आणि एका स्टुडियोंतील नटींचे फोटो रंगवितो, यांत त्याला त्याच्या भावासारखा कमीपणा वाटत नव्हता. सतत सहा महिने राहूनही त्या चाळींतील एकाही मनुष्याशीं त्याचा परिचय झाला नव्हता. तथापि, चाळींतील चांभारचौकशा करण्या-वाचून करमत नसलेल्या कांहीं उद्योगी जीवांनीं, प्रभाकर जमखंडीच्या-प्रख्यात बाबासाहेब इनामदारांचा मुलगा आहे ही माहिती मिळविली होतीच!

अशाच एका रात्रीं आठ वाजण्याच्या सुमारास प्रभाकर चौपाटी-वरून फिरून घरीं येत होता. तोंच त्याला आपल्या चाळीच्या प्रवेशदाराशीं एक तरूण स्त्री पडलेली व तिच्या भोंवतीं बऱ्याच तमासगिरांची गर्दी झालेली दिसली. काय प्रकार आहे तो पहाण्यास प्रभाकर गर्दीतून पुढें गेला. तों तमासगिरांच्या कोंडाळ्यांत मूर्च्छा येऊन पडलेली एक असहाय्य तरुण स्त्री तेथें होती. तिच्या एकंदर वेशावरून ती अगदीं दरिद्री पण ब्राह्मण जातीची असावी असा प्रभाकरानें अंदाज केला. अंगावरालें एकुलतें एक पण अस्ताव्यस्त

झालेलें वस्त्र तिची लज्जा रक्षण करण्यास अगदींच अपुरें होतें. तशांतून तिला दिवस गेले होते; मग कुटाळ लोकांना ही नामीच संधीच मिळाल्या-सारखें वाटल्यास नवल काय? कोणी कांहीं कोणी कांहीं, असें आपआपल्या परीनें तर्कटें करीत होतें. पण, त्यांपैकीं एकाही महाभागाला तिला औषधो-पचार करण्याकरितां डॉक्टरकडे नेण्याची बुद्धी होत नव्हती. प्रभाकरला हा सर्व प्रकार पाहून अत्यंत चीड आली—तितकाच त्याला उद्वेग वाटला. आपल्या जातींतील एका असहाय्य स्त्रीबद्दल लोकांनीं इतकी असहिष्णुता दाखवावी, याबद्दल त्याला उद्वेग वाटला. त्या गर्दीतून तो पुढें झाला व लोकांच्या रागालोभाची, कुटाळकीची, निंदेची व इतर कशाचीही पर्वा न करतां त्यानें त्या तरुण स्त्रीला चटदिशी उचलून आपल्या खोलींत नेलें. स्टेशनवरील गाडी गेल्यावर ज्या-प्रमाणें गर्दी पांगावी त्याप्रमाणें तेथील भक्ष वस्तू नाहींशी झाल्यावर घटकाभर गंमत करण्याकरितां जमलेले ते सर्व तमासगीर एका मागून एक असें हळू हळू निघाले. जातां जातां त्यांनीं काढलेले उद्गार प्रभाकराला ऐकूं गेलें असतें तर?

प्रभाकरानें त्या तरुण स्त्रीला वर आपल्या खोलींत आणून कॉटवर झोंपविलें. तिच्या आंगावर आपली पांघरावयाची चादर घातली व तिला शुद्धीवर आणण्याचा तो प्रयत्न करूं लागला. थोड्याशा प्रयत्ना-नंतर ती स्त्री शुद्धीवर आल्यावर तिनें एकदम 'बाबा' म्हणून हांक मारली; पण आपल्या बाबांच्याऐवजीं एका अपरिचित तरुणाला तेथें पाहून तिला आश्चर्य वाटलें. लज्जेनें, भितीनें तिनें आपलें तोंड आपल्या हातांनीं झांकून घेतलें व ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. रडाण्यानेंच तिचा दुःखभार थोडासा हलका होईल, या समजुतीनें प्रभाकर थोडावेळ स्तब्ध बसला. दहा पंधरा मिनिटानंतर ती स्त्री शांत झाली असें पाहून प्रभाकरानें तिला तिची हकीकत विचारली. तिच्या हकीकतींत नाविन्य नव्हतें! कांहीं तरुण कुमारी-

कांना येणारे दुर्दैवच तिच्या वांटणीला आलें होतें. आणखी सहा महिन्यांनीं तिला मातृत्त्व प्राप्त होणार होतें. पण समाजाच्या दृष्टीनें तिचें तें मातृत्त्व भयंकर पाप होतें; अमंगळ—तिरस्करणीय असें कृत्य होतें! तिच्या एका बरोबरीच्या तरुणानें तिला विवाहाचे अमिष दाखवून तिच्या तारुण्याचा बहार लुटला होता, आणि निर्मलेचें निर्माल्य झाल्यावर एखाद्या भ्याड्याप्रमाणें तो तरुण आणखी एखाद्या गुलाबाचा चुरगळा करावयास निघून गेला होता. प्रभाकरला निर्मलेची ही हकीकत ऐकून अत्यंत चीड आली. तिच्या बापानें तिला घराबाहेर काढली होती. सकाळपासून बणबणा फिरून पोटांत अन्नाचा कणही न गेल्यामुळें व तशांत गरोदरपणामुळें तिला विलक्षण थकवा येऊन ती बेशुद्ध स्थितींत पडली होती.

× × × ×

प्रभाकरकडे निर्मला येऊन राहिल्याला आतां पंधरा दिवस लोटले होतें. सगळेंच जग कांहीं वाघसिंहासारख्या क्रूर प्राण्यांनीं भरलेलें नाहीं, तेथेंही कांहीं सज्जन आहेत, अशी प्रभाकरच्या वर्तणुकीवरून निर्मलेची खात्री पटली होती. या पंधरा दिवसांच्या काळांत तिच्याकडे प्रभाकरनें एकदांहीं लोभी दृष्टीनें पाहिलें नव्हते. निर्मलेच्या भोंवतीं गोंडाघोळणाऱ्या अनेक तरुणांचा तिला जो अनुभव होता आणि केशवनें आपला कसा विश्वासघात केला होता, याची जाणीव असल्यामुळें निर्मलेला साऱ्याच तरुणांबद्दल एकप्रकारचा तिटकारा उत्पन्न झाला होता; पण प्रभाकरची वर्तणुक मात्र फारच वेगळी होती. जगन्नाथनें त्याला पापी ठरविलें होतें. माईसाहेबांच्या दृष्टीनेंही साधनाच्या घरीं गाणेंबजावणें ऐकण्याकरतां जाण्यात त्यानें फारच मोठें पाप केलें होतें. त्यानें मनांत आणलें असतें, तर निर्मलेच्या त्या असहाय्य स्थितीचा त्याला वाटेल तसा फायदा घेतां आला असता, पण तसला विचारही त्याच्या मनाला कधीं शिवला नाहीं.

सरळ्या भावाची आपल्या बहिणीशीं जितकी पवित्र वर्तणुक असते. तितकीच त्याची निर्मलेच्या बाबतींत होती. आणि म्हणूनच चाळींत त्याच्याबद्दल आणि निर्मलेबद्दल वाटेल ते प्रलाप काढले जात असतां-नाही तो डगमगला नाहीं. ज्याचें मन शुद्ध त्याला कशाची भिती आहे, अशी त्याची विचारसरणी होती. एक तरुण कुमारिका एका अविवाहित पुरुषाच्या खोलींत रहाते. याचें चाळींतील चळवळ्या लोकांना राहून राहून आश्चर्य वाटत होतें. कांहीं तर्कदुष्टांनीं तर निर्मलेचा आणि प्रभाकरचा प्रथमपासूनच संबंध असावा अशी अफवा उठविण्यास कमीं केलें नाहीं. प्रभाकरला या सर्वांबद्दल कांहींच वाटत नव्हते ! आतांपर्यंत त्याला जगन्नाथासह जगाचा जो थोडाफार अनुभव आला होता, त्यावरून या सर्व आहेरांचीं त्यानें अगोदरच अपेक्षा केली होती. निर्मलेला मात्र दुःखावर डागण्या दिल्या-सारखे लोकांचे प्रलाप वाटत. पुरुष तर राहोतच. पण आपल्याच जातीच्या स्त्रियासुद्धां आपल्याबद्दल आणि प्रभाकराबद्दल वाटेल तसे निर्लज्ज प्रलाप काढतात, याचें तिला फार दुःख होत होतें. 'समाजा-च्या दृष्टीनें आपण पतिता आहोंत रुढ कल्पनांनीं व नितीशास्त्रांनीं पाप ठरविलेलें कृत्य आपण केलें आहे. हें खरें असलें तरी आपल्या इतकाच केशवही पापी आहे ! आपली लग्नमर्यादा ओलांडून गेली असतांही आपल्या लग्नाची कांहींच खटपट न करतां, स्वतःची दुसरी बायको मेल्यावर तिसरीच्या गळ्यांत देवाब्राम्हणांसमक्ष मंगलसूत्र बांधून आयुष्याचा आनंद लुटणारे आपले बाबाही, तितकेंच पापी नाहींत काय ? मग, हे पापी—ते केवळ पुरुष आहेत म्हणून समाजा-कडून पुण्यशील गणले जातात, आणि आपण स्त्री म्हणून त्या पापाचें प्रायःश्चित आपल्याला भोगावें लागतें हा न्याय कोणत्या न्यायशास्त्राचा आहे,' याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटे, दुःख तर होत असेच !

आणखी कांहीं दिवस असेच निघून गेले. निर्मला आतां आपलें

दुःख हळूंहळूं विसरून गेलीं होती. प्रभाकरलामात्र निर्मलेचें काय करावें, याचा विचार करकरूनही कांहीं मार्ग सांपडत नव्हता. तिच्याकरतां एखादी नोकरी बघावी तर तिला दिवस गेल्यामुळें तें शक्य नव्हतें. चाळींतील चवचाल व चटेल लोकांची जीभ दिवसेंदिवस जास्तच सुटत चालली होती. कोणता मार्ग स्वीकारावा याचा त्याला कांहींच निर्णय करतां येईना. पण कांहीं दिवसांनीं त्याला एक मार्ग दिसला. कोठल्याशा एका सिनेमांत त्यानें एक तरुण समाजाची; आपल्या आईबापाची, भावाची पर्वा न करतां एका पतित गणल्यागेलेल्या तरुणीशीं लग्न करतो असें त्यानें पाहिलें होतें. त्याची त्याला यावेळीं आठवण झाली. 'आपणही हाच मार्ग स्वीकारला तर ? काय हरकत आहे ? निर्मलेनें कांहीं जाणूनबुजून पाप केलें नव्हतें. तारुण्यसुलभ अशा भावनांना ती बळी पडली होती. तिच्याशीं आपण लग्न केलें तर एका कुमारिकेचा उद्धार होईल. आपल्या एकाकीं जीवनांत आपल्याला एक जोडीदार लाभेल. जगन्नाथ काय म्हणेल, माईसाहेबांना काय वाटेल, याचा आपल्याला विचार करण्याचें कारण नाहीं. त्यांच्या दृष्टीनें आपण केव्हांच मेलों आहोंत' ! असा त्यानें मनाशीं विचार करून एके दिवशीं दुपारीं निर्मलेला आपला बेत स्पष्टपणें सांगितला.

प्रभाकरचा तो बेत ऐकून निर्मला एकदम चमकली ! तिनें या प्रश्नाची कधींच अपेक्षा केली नव्हती. इतकेंच नव्हे तर, केशववरूनच तिनें सर्व तरुण पुरुषांबद्दल एकप्रकारचे अंदाज बांधले होते, त्याला प्रभाकरच्या या प्रश्नानें धक्काच बसला होता. निर्मलेच्या डोक्यांत विचारांनीं काहूर उठविलें. बराच वेळ ती स्तब्ध बसली, पण आपण असेच गप्प बसलो, तर त्याचा अर्थ प्रभाकर भलताच करील, असें वाटून ती म्हणाली, " प्रभाकर आगोदरच तुमचे माझ्यावर इतके उपकार आहेत कीं, त्यांत आणखीं या उपकाराचें ओझें डोक्यावर

घेण्याची ताकद मला राहिलीं नाहीं. आपण केवढ्या मोठ्या घराण्यांतले, आपला लौकिक केवढा आणि या सर्व वस्तुस्थितीकडे डोळे झाकून आपण माझ्यासारख्या एका पतित गणल्यागेलेल्या स्त्रीशीं लग्न करावयाचा विचार करता. आपल्याला मी मुळींच योग्य नाहीं."

निर्मलेनें पुन्हां एकदां आज बरेच दिवसांनीं स्वतःच्या घराण्याच्या मोठेपणाची जाणीव प्रभाकराला करून दिली होती. घराण्याचा हा मोठेपणा आपल्या पदोपदीं आड येत आहे, त्याच्यापेक्षां मी एखाद्या अगदीं गरीब कुळांत जन्माला आलों असतो तर ? साधनेच्या घरीं मी नाचगाण्यास गेलों तेथेंही जगन्नाथाच्या दृष्टीनें मी पाप केलें; कां तर, घराण्याचा मोठेपणा ! माईसाहेबांचीही हीच विचारसरणी ! या विचारचक्रामुळेंच की काय, प्रभाकरनें निर्मलेला कांहींच उत्तर दिलें नाहीं व पुन्हां तिला कांहीं प्रश्नही विचारला नाहीं. निर्मलेला प्रसंग टळल्याचा आनंद वाटला. तिला प्रभाकरशीं लग्न करावयास नको होतें. असें नाहीं; पण आपण त्याला अनुरुप नाहीं अशी तिच्या मनाची पक्की समजूत झाली होती.

दुसरा दिवस प्रभाकर व निर्मला या दोघानींही अत्यंत अस्वस्थ मनःस्थितींत घालविला. प्रभाकरला कां कोणास ठाऊक तो प्रश्न निर्मलेला पुन्हां विचारण्याचें धैर्य झालें नाहीं ते! तो भीत होता असें नव्हे, पण आपण निर्मलेशीं लग्न करण्यांत चुकतो आहोंत कीं काय अशी शंका त्याला अस्वस्थ करून टाकीत होती. 'आणखी थोड्याच महिन्यांत निर्मला माता होणार आणि मुलांचें पितृत्त्व आपण बळेंच आपल्यावर लादून घेणार हें योग्य कीं अयोग्य ! त्यापेक्षां आपल्या आयुष्यांत निर्मला आलीच नसती तर, ? दोघांचेही हें अस्वस्थतेचे व किंकर्तव्यतेचे आणखी किती दिवस गेले असते कोणास ठाऊक. पण, मध्येंच एक प्रसंग असा घडून आला कीं, प्रभाकरला निर्मला ही आपली पत्नी आहे असें चार चौघांदेखत सांगणें भाग पडलें.

त्यांचें असें झालें! चाळींतल्या एका रिकामटेकड्या व साऱ्या विश्वाच्या पापपुण्याचा जणूं आपल्याकडेच मक्ता आहे असें समजणाऱ्या एका नरपुंगवानें प्रभाकरबद्दल पोलिसांकडे एक खोटानाटा तक्रार-अर्ज दाखल केला. वास्तविक या प्रकारांत पोलिसांनीं लक्ष घालावे असें कांहीं नव्हते; पण मग, तें पोलिसखातें कसलें? सुतानें स्वर्गाला जाण्याचा, नसतील तेथें नव्या भानगडी निर्माण करण्याचा व असतील त्या भानगडींतून आणखी भानगडी उकरून काढावयाच्या ह्या आपल्या कर्तव्यबुद्धीला पोलिस जागले! 'ही बाई तुमची कोण'? या एका पोलिस अधिकाऱ्याच्या अनाहूत प्रश्नाला त्यानें 'ती माझी भावी पत्नी आहे, उद्यांच आम्ही रजिस्टार कचेरींत आमच्या विवाहाची नोंद करणार आहोंत', असें चाळींतल्या चार लोकांदेखत सांगून टाकलें! कांहींच शिकार न मिळाल्यामुळें पोलिस रिकाम्या हातानें परत गेले! चाळींतील सर्वांचीं तोंडें बघण्यासारखीं झालीं! त्यांतील महाभागाना आपण केलेला तर्क खरा ठरल्याबद्दल स्वतःचे पितर स्वर्गांत गेल्याचा आनंद लाभला! प्रभाकराला आपल्या विचारांना मूर्तस्वरूप आले म्हणून आणि निर्मलेला—? खरोखरच निर्मलेचा आनंद गगनांत मावेनासा झाला होता.

दुसऱ्याच दिवशीं प्रभाकर—निर्मला यांनीं रजिस्ट्रार कचेरींत जाऊन आपल्या विवाहाची नोंद केली—व ठरलेल्या मुदतीनंतर त्यांचा रजिस्टर विवाहही झाला!

## — ४ —

प्रभाकर आणि निर्मला यांच्या विवाहाची बातमी एरवी जगन्नाथ-माईसाहेब यांना केव्हां कळली असती कोणास ठाऊक? पण, एका उपद्व्यापी गृहस्थानें स्वतःच्या पदराला चाट देऊन एका पत्रानें ही

बातमी जगन्नाथाला कळविली. त्याच्या पत्राचा आशय थोडक्यांत असा होता.

श्री. जगन्नाथराव इनामदार यांस, सा. न., वि., वि.

आपला माझा परिचय नाहीं. तथापि, मी आपणाला आज जी बातमी कळविणार आहे, त्याकरतां आपल्या पूर्वपरिचयाची जरूरी आहे असें मला वाटत नाहीं. आपले बंधु प्रभाकरपंत यांनीं निर्मला नांवाच्या एका तरुणीशीं—जिचें पाऊल आगोदरच वाकडें पडलें आहे अशा एका तरुणीशीं नुकताच रजिस्टर विवाह केला आहे. आणखीं सहा महिन्यांनींच आपल्या मातोश्रींना नातू व आपल्याला पुतण्या होईल." क. लो. अ.

आपला

आनंदराव पंडित,

आनंदरावांच्या या कुत्सित पत्रानें इनामदार घरण्यावर बॉंबगोळाच पडला होता !

माईसाहेबांना पतीनिधनानंतर हा असा दुसराच कटु प्रसंग होता ! आनंदरावांचें पत्र आलें त्या दिवशीं त्या एखाद्या लहान मुलांसारख्या रडल्या ! घराण्याचा बदलौकिक, वृद्धावस्थेंत आपल्यावर ओढावलेला हा प्रसंग यामुळें त्यांचें अगोदरच खचलेलें मन अधिकच खचलें !

आणि जगन्नाथ ! आनंदरावाचें पत्र वाचल्यापासून त्याला प्रभाकराचें काय करूं आणि काय नको असें झालें होतें ! एका पतित कुमारिकेशीं आपल्या भावानें लग्न करावें याचा त्याला मनस्वी संताप आला होता. प्रभाकरनें नुसतें म्हटलें असतें तर आपण मागील सर्व गोष्टी विसरूनहि त्याच्याकरितां छपन्न उपवर मुली उभ्या केल्या असत्या. पण, आतां त्याचा काय उपयोग होता ?

आनंदरावाच्या पत्रानें त्या इनामदार घराण्यांतलें सारें स्वास्थ्य,

सारा आनंद यांची राखरांगोळी करून टाकली होती ! माईसाहेब दुःखानें आंतल्या आंत कढत होत्या !

या सर्वाला अपवाद होता फक्त विनोदिनीचा ! ती एक स्त्री होती ! तरुण स्त्री होती ! गोडगोड बोलून तरुण कुमारिकांचे गळे कापणाऱ्या संधिसाधु तरुणांचा तिला स्वतःला अनुभव नव्हता तरी तिला ते वाचून माहित होतें. विषानें मनुष्य मरतो हा सिद्धांत खरा किंवा खोटा, याचा कुणी कधीं पुन्हां प्रयोग करून पाहिला आहे ? तारुण्यसुलभ भावना या विषासारख्याच नाहींत काय ? योग्यवेळीं—योग्यकाळीं त्या भावनांना वाट करून दिली तर याच विषमय भावना अमृतमय ठरतात ! असें विचार तिच्या मनांत आलें.

विनोदिनीच्या मनांत आले 'निर्मलेचा विश्वासानें गळा कापणाऱ्या तरुणानेंच जर तिच्याशीं लग्न केलें असतें, तर निर्मलेची पतित म्हणून हेटाळणी करण्याची कोणाची छाती होती ? कौमार्यभंगावर लग्नाचें आवरण घातले गेलें तर त्या स्त्रीला समाजांत मानमरातबानें रहातां येतें' ! निर्मलेशीं विवाह करण्यांत प्रभाकरनें कांहीं भयंकर पाप केलें आहे असें विनोदिनीला मुळींच वाटलें नाहीं. उलट कदाचित आणखी अधःपात होण्याचा संभव असलेल्या एका तरुणीला त्यानें आपल्या पंखाखालीं घेतलें ! कुणाला ठाऊक प्रभाकरनें तिच्याशीं लग्न केलें नसतें, तर निर्मला कदाचित वेश्या बनली असती !

निर्मलेवरून आपल्या गांवांतील सख्या महाराच्या गौरीची तिला आठवण झाली ! तिचा तो झालेला भयंकर शेवट, तिला यावेळीं आठवला ! निर्मला आणि गौरी ! दोघींवरही एकाच तऱ्हेचा प्रसंग ओढवला होता !

गौरीचें तारुण्य तिच्याच जातींतल्या एका नराधमानें जबरीनें लुटलें होतें आणि त्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला !

गौरीला दिवस गेल्याची बातमी महारवाड्यांत सर्वत्र पसरल्यावर तिला सर्वांनीं खाऊं कीं गिळूं असें करून टाकलें! सख्यानें तर तिचा खून करण्याकरतां आपल्या हातांतील कुऱ्हाडीचा घाव तिच्यावर घालण्याचा प्रयत्न केला होता! गौरीची आई त्यावेळीं जर मध्यें पडली नसती, तर सख्यानें आपला मनोदय पुरा केला असतां! आणि पुढें—पुढें?

गौरीनेंच एके दिवशीं आपल्या अंगावर रॉकेल ओतून घेऊन स्वत:बरोबर स्वत:चें पापही जाळून भस्मसात केलें! तिचा तो भयंकर विद्रूप झालेला चेहेरा आठवून विनोदिनीच्या अंगावर शहारे आले!

आणि निर्मला?

निर्मलेला जर प्रभाकरनें आश्रय दिला नसता, तिच्याशीं लग्न केलें नसतें तर गौरीसारखीच तिची अवस्था झाली असती!

असहाय्य—पतित स्त्रिया स्वीकारतात तसला घाणेरडा मार्गही कदाचित निर्मलेला स्वीकारावा लागला असता! अशा या विचार-चक्रांनीं विनोदिनींचें मस्तक सुन्न झालें!

× × ×

जगन्नाथला त्यांतल्या त्यांत समाधान वाटण्यासारखी एकच गोष्ट आनंदरावाच्या पत्रांत होती, आणि ती म्हणजे प्रभाकर—निर्मला यांचा विवाह वैदिकपद्धतीनें झालेला नसून रजिस्टर पद्धतीनें झाला आहे! आपण मुंबईला जावें, प्रभाकरची भेट घ्यावी, त्याचें मन परावृत्त करून त्याच्याकडून निर्मलेशीं घटस्फोट घ्यावयाला लावावा, असे विचार जगन्नाथाच्या मनांत सारखे येत होते! आपल्याला आपल्या अंगिकृत कार्यांत कितपत यश येईल याची त्याला शंकाच होती!

प्रभाकरचा स्वभाव किती हटवादी आहे याची त्याला पुरेपूर

कल्पना येण्यासारखे अनेक प्रसंग त्याच्या डोळ्यापुढून झरझर निघून गेले !

एकाही प्रसंगाच्या वेळीं प्रभाकरानें माघार घेतली नव्हती ! कॉलेजमधून रस्टिकेट झाल्यावरसुद्धां आपल्या भावी आयुष्याचा विचार करतांना प्रभाकरानें माफी मागण्याचें साफ नाकारून गृह-त्याग केला होता !

त्याच्या गृहत्यागाचा प्रसंग आठवून तर जगन्नाथ फारच निराश झाला !

पण, आशा वेडी असते ना ? आणि त्यांतून माईसाहेबांची आशा तर अपत्यप्रेमानें पुरेपूर भारावलेली होती ! आपल्या मनाची विकल स्थिति प्रभाकरला कळल्यावर तरी निदान तो आपल्या शब्दाला मान देईल, जगन्नाथाचें ऐकेल, असें त्यांचें आशावादी मन त्यांना सांगत होतें !

त्यांना काय माहिती कीं लहानपणीं देवाला नैवेद्य दाखविण्याच्या अगोदरच दुधाचा हट्ट धरणारा, पण पाठीमागून देव मारील या आपल्या धाकानें आपला हट्ट सोडून नैवेद्यानंतर दूध पिणारा प्रभाकर आतां राहिला नव्हता !

नैवेद्याचें दूध आणि निर्मला या काय दोन्ही सारख्याच गोष्टी होत्या ? इतकें असूनही त्यांचे आशावादी मन त्यांना स्वस्थ बसूं देईना आणि म्हणूनच त्यांनीं जगन्नाथाच्या फारसें मनांत नसतांनाही त्याला मुंबईला जाण्याचा आग्रह केला !

विनोदिनीलामात्र या साऱ्या प्रकाराचें राहून राहून आश्चर्य वाटत होतें ! जगन्नाथाप्रमाणेंच तिनेंही प्रभाकरचें निग्रही मन जोखलें होतें ! प्राण गेला तरी प्रभाकर आतां निर्मलेशीं घटस्फोट घेणार नाहीं, अशी तिची बालंबाल खात्री होती !—नव्हे प्रभाकरानें घटःस्फोट

करूं नयेच असें तिला राहून राहून वाटे ! इतकें असूनही तिनें जगन्नाथाच्या जाण्यांत मात्र अडथळा आणला नाहीं !

× × ×

जगन्नाथ मुंबईला गेला आणि तसाच रिकाम्या हातानें परत आला ! आपल्या आणि प्रभाकरच्या मुलाखतीची जी हकीकत त्यानें माईसाहेबांना सांगितली ती ऐकून माईसाहेबांना आपल्यावर आकाश कोसळल्यासारखें वाटलें ! विनोदिनीला मात्र प्रभाकरच्या निश्चयी स्वभावाबद्दल फार समाधान झालें !

जगन्नाथाला आपला मनोदय पुरा झाला नाहीं म्हणून वाईट वाटलें, आणि तो दुःखीकष्टी झालेला पाहून विनोदिनीलाही वाईट वाटलें; पण या गोष्टी आतां अशा थराला गेल्या होत्या कीं, तेथें कुणाचें कांहींही चाललें नसतें !

जगन्नाथ मुंबईहून परत आल्याच्या सातव्याच दिवशीं प्रभाकर-कडून माईसाहेबांना पत्र आलें !

"आई," प्रभाकरनें लिहिलें होतें, "मी निर्मलेशीं— तुझ्या दृष्टीनें एका कुमार्गी तरुणीशीं लग्न केलेलें पाहून तुला मनस्वी वाईट वाटलें याबद्दल मलाही फार वाईट वाटतें ! मी निर्मलेशीं विवाह केला तो मला दुसरी कुणी मुलगी मिळत नव्हती म्हणून नव्हे ! आई— तूंही एक स्त्री आहेस. स्त्री-हृदयांतील भावना तुला चांगल्या कळत असल्या पाहिजेत आणि मी निर्मलेशीं लग्न केलें नसतें तर ती कोणत्या मार्गाला लागली असती याचा तूं शांत मनानें विचार केलास, तर माझ्या करण्यांत तुला कांहीं वाईट दिसणार नाहीं ! मी केलें तें पाप तर नाहींच, पण उलट एका दृष्टीनें पुण्यच आहे ! तूं रोज पुराणें वाचतेस ! अहिल्येसारख्या पतीत स्त्रीचा उद्धार श्री-रामचंद्रांनीं केला, हा कथाभाग तुझ्या अत्यंत आवडीचा आहे.

आणि मी—मी मात्र अधःपाताच्या खोलगर्तेत पडून आपल्या समाजाला लांछन होऊं पहाणाऱ्या एका तरूण स्त्रीला तिच्याशीं लग्न करून वाचविलें म्हणून पापी ! तुमच्या या पापपुण्याच्या कल्पना तुमच्या तुम्हालाच लखलाभ होवोत !'

शेवटीं एकच सांगावयाचें आहे कीं, 'जगन्नाथनें केला तसला प्रयत्न पुन्हा केला जाऊं नये ! तूं मला आपला मुलगा म्हणावयाचें सोडून दिलेस तरी मीमात्र मरेपर्यंत तुला आपली आईच म्हणणार ! शेवटीं एक दिवस असा येईल कीं, तुम्हां सर्वांना माझें म्हणणें पटेल' !

तुझा
प्रभाकर !

प्रभाकरच्या या पत्रानें माईसाहेबांचा दुःखभार हलका होण्याऐवजीं वाढला मात्र ! त्यांच्या मनांत आलें, 'कुठें ती साध्वी अहिल्या आणि कुठें ही निर्मला' ? पण या पत्राचा दुसरा कांहीं नाहीं, तरी एकमात्र परिणाम झाला आणि तो म्हणजे या उप्पर प्रभाकरचें नांव काढावयाचें नाहीं, असा आपल्या मनाशीं माईसाहेबांनीं निश्चय केला !

त्यांच्या मनांत आलें 'धाकटा माधव नाहीं का जन्माला आल्यापासून एक महिन्यांतच आपल्याला दुरावला ? तसाच प्रभाकर' !

जगन्नाथाच्या दृष्टीनें तर प्रभाकर केव्हांच मेला होता ! आपल्याला प्रभाकर नांवाचा एक भाऊ होता ही गोष्टच त्यानें मनांतून काढून टाकली !

आणि विनोदिनी !

तिच्या मनांतील प्रभाकरबद्दलची सहानुभूती कायम होती ! स्त्री हृदयानेंच ती निर्मला—प्रभाकरच्या विवाहाकडे पहात होती !

— ५ —

प्रभाकर–निर्मला यांच्या विवाहामुळें आपल्या मनावर झालेल्या आघाताच्या जखमा जगन्नाथ आणि माईसाहेब, या जरा कोठें बिसरतात न बिसरतात तोंच आणखी दुसरा एक आघात त्यांच्यावर झाला !

पहिल्या आघाताचें जगन्नाथाला फारसें वाटलें नाहीं, पण या दुसऱ्या आघातानें मात्र त्याला आपलीं सर्व गात्रें बधीर झाल्यासारखें वाटलें !

त्याचें असें झालें !

मालतीच्या बाबतींत रदबदली करण्यास आलेल्या वृद्धकाकांना जगन्नाथनें निराश केल्याच्या प्रसंगाला आतां महिन्याच्यावर काळ लोटला होता !

मालतीची आठवण तो केव्हांच विसरला होता !

पण त्याची ती आठवण अशा एका दारुण प्रसंगानें जागृत झाली कीं, त्यांतून दोन आघात त्याच्या मनावर झाले !

गांवांतील कुटाळांच्या जाचाला कंटाळून, स्वतःच्या पित्यावरील संकटपरंपरेला त्रासून व आपला वाली या जगांत कोणीच नाहींसें पाहून, आर्त झालेल्या मालतीनें नदींत जीव दिला व आपली कायमची सुटका करून घेतली ! हांहां म्हणतां मालतीच्या आत्मघाताची बातमी सर्व गांवभर झाली, आणि त्याची झळ इनामदार घराण्याला लागल्याशिवाय राहिली नाहीं !

जगन्नाथ–विनोदिनी आणि माईसाहेब यांचें त्यावेळीं जेवण चाललें होतें तोंच गड्यानें ही बातमी त्यांच्या कानावर घातली !

विनोदिनीनें तोंडाशीं नेलेला घास चटकन खालीं पडला व त्याचबरोबर तिच्या डोळ्यांतून दोन अश्रू पानांत टिपकले !

जगन्नाथही क्षणभर सुन्न झाला ! त्याच्या डोळयांपुढें वृद्धकाकांची ती मूर्ती एकदम उभी राहिली ! आणि एकदम—एकदम त्याला काकांचे शेवटचे शब्द आठवले ! 'विनोदिनीवर कुमारी माता होण्याचा प्रसंग आला तर तिला दूर लोटूं नका,' हे शब्द एखाद्या त्रस्त समंधाप्रमाणें त्याच्या डोळ्यापुढें थयथय नाचूं लागले !

चटकन् त्याचें लक्ष विनोदिनीकडे गेलें !

तिच्या चेहेऱ्यावरचा तो दुःखभार पाहून त्याचें मन द्रवलें ! पुढ्यांतील ताट बाजूस सरकवून तो ताडकन पानावरून उठला !

विनोदिनीची जेवणावरची वासना तर केव्हांच उडाली होती ! तीही पानावरून उठून जगन्नाथाच्या मागोमाग नदीतीरावर गेली !

तेथील प्रसंग एखाद्या पाषाणहृदयीं मनुष्याच्या हृदयालाही पाझर फोडील असाच होता ! वृद्धकाका मालतीचें डोकें आपल्या मांडी-वर घेऊन एखाद्या बालकाप्रमाणेंच शोक करीत होते !

आणि मालती ? पृथ्वीतलावर आपलें गाऱ्हाणें कोणींच ऐकत नाहींसें पाहून त्या दयाघन परमेश्वराकडे न्याय मागण्यास ती केव्हांच चालती झाली होती ! हतबल झालेल्या तिच्या चेहेऱ्यावरचें ते नैराश्य अद्यापही तेथेंच होतें !

मालतीचे डोळे आपल्याकडे रोखून पाहून, 'तुम्ही—तुम्हीच माझा खून केलांत,' असें आपल्याला आर्तस्वरानें ओरडून सांगत असल्याचा भास जगन्नाथाला झाला ! तिच्या डोळ्यांकडे पुन्हां बघ-ण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं !

विनोदिनीला मालतीचा शेवट पाहून काय वाटलें हें सांगणें शब्दापलीकडचें आहे !

मालती आणि गौरी ! दोघींचाही शेवट किती भीषण झाला होता ! एक अगदीं पांढरपेशा वर्गांतील, तर दुसरी मागासलेल्या जातींतील ! पण, पापपुण्याच्या रूढ कल्पनांबद्दल दोघींनाही प्रायःश्चित

मात्र भोगावें लागलें होतें एकच, आणि तें म्हणजे मृत्यूला मगरमिठी मारण्याचें ! मालतीच्या आत्महत्येनें तर, तशा त्या करूणक्षणींही विनोदिनीला प्रभाकरची आठवण झाल्याखेरीज राहिली नाहीं !

तिला वाटलें 'निर्मलेला प्रभाकर भेटला नसता, तर तिची स्थितीही कदाचित या मालतीसारखीच झाली असती' !

मालती ! गौरी ! आणि निर्मला ?

मालतीच्या कलेवराभोंवती झालेली गर्दी दूर हटवून जगन्नाथ पुढें झाला व त्यानें चटकन् काकांच्या खांद्यावर हात ठेवला ! तशा त्या स्थितींतही काका चपापले ! त्यांनीं वर पाहिलें आणि त्यांना जगन्नाथ दिसल्याबरोबर ते म्हणाले, " इनामदारसाहेब आतां तरी तुमचे समाधान झालें ! आतां ती सुखी आहे ! तिचा विश्वासानें गळा कापणारा तो नराधम जितका तिच्या मृत्युस कारणीभूत आहे, तितकेच तुम्हीही आहांत ! हा नुसता मृत्यु नाहीं—हा निव्वळ खून आहे—राक्षसी खून "! काकांचें अंतःकरण मालतीच्या मृत्यूनें शतशः विदीर्ण झालें होतें ! त्यांच्या त्या भयंकर शब्दांनीं जगन्नाथाला आपल्या हृदयांत कुठेंतरी खोलवर जखम झाल्यासारखें वाटलें ! क्षणभरच काकांचें म्हणणें त्याला पटलें ! आपण मालतीला क्षमा केली असती, तिला सन्मार्गाला लावण्याचा प्रयत्न केला असता, तर मालतीला हें अघोर साहस करावें लागलें नसतें !

जगन्नाथाच्या मनांत हे विचार क्षणभर-अगदीं क्षणभरच टिकले, आणि थोड्याच वेळांत त्याला आपण मालतीला क्षमा न करण्यांतच योग्य वर्तन केलें असें वाटूं लागलें !

'असल्या भयंकर पापाला प्रायःश्चित्त म्हणजे मृत्युच' !

'या मृत्युनें आतां मालतीचें पाप धुवून निघालें आहे ! आतां ती पवित्र झाली आहे' ! जगन्नाथनें इकडे तिकडे पाहिलें तो त्याला त्या

गर्दीत विनोदिनी दिसली. इतकेंच नव्हे तर ती वृद्धकाकांना चार समाचाराच्या गोष्टी सांगत होती ! जगन्नाथाला तिचा राग आला !

'विनोदिनी, तुझें इथें काय काम आहे? तूं घरीं जा,' जगन्नाथनें तिच्याकडे पाहून रागानें म्हटलें.

विनोदिनीच्या डोळ्यांत क्षणभरच वीज चमकल्याचा जगन्नाथाला भास झाला! तीही आपला उसळूं पहात असलेला राग आवरून म्हणाली, "जेथें जेथें दुःख दिसेल, तेथें तेथें त्या दुःखाचा भार हलका करण्याचा प्रयत्न करणें हें सर्वांचें कर्तव्य आहे ! मी मुळींच घरीं जाणार नाहीं !" विनोदिनीच्या आवाजांत जगन्नाथाला कठोर निश्चयाची जाणीव झाली ! तिच्याकडे दुर्लक्ष करून त्यानें इतरांना मालतीचें शव तेथून हालविण्यास सांगितलें !

आतांमात्र वृद्धकाकांचा संताप आणखीच अनावर झाला. त्या संतापाच्या भरांत ते बडबडूं लागले.

"तुम्ही–तुम्ही माझ्या मालूला ठार मारलेंत ! दूर व्हा ! तुम्ही तिच्यावर शेवटचा आघात केलात !"

"काका, आतां या आक्रोशाचा कांहीं उपयोग नाहीं, पापाचें प्रायःश्चित मृत्युनेंच मिळावयाचें !"

काकांना चार समजुतीच्या गोष्टी सांगून त्यांचा दुःखभार हलका करण्याऐवजीं पापपुण्यासारख्या तत्त्वज्ञानाच्या निरुपयोगी गोष्टी जगन्नाथानें त्यांना सांगाव्यांत हे पाहून विनोदिनीला मनस्वी चीड आली ! ती एकदम उसळून जगन्नाथ व काकांच्या मध्येंच उभी राहिली.

'जा–तुम्ही घरीं जाऊन आपल्या मनाला या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगत बसा ! मालूच्या त्या चेहेऱ्याकडे पाहूनही तुम्हांला काका काय म्हणताहेत हें पटत नसेल,–खरें वाटत नसेल तर–तर मग तुमचें

हृदय कशाचें बनविलें आहे हें मला समजत नाहीं ! मी तुम्हाला नुसती तत्त्वज्ञानीच समजत होतें, पण तुम्ही भावना-शून्य-पाषाण-हृदयी, माणसाचे अवयव असलेला एक दगडी पुतळा आहांत ! मालतीचा तुम्हीच खून केलांत ! माणुसकीचा—साहिष्णुतेचा अभाव असलेला तो धर्म तुमचा तुम्हालाच लखलाभ होवो !"

विनोदिनीच्या या मर्मभेदक आघातानें जगन्नाथ स्तंभित झाला आणि थोड्या वेळानें कांहीं एक न बोलतां तो तेथून निघून गेला ! जमलेल्या लोकांनीं मालतीचें शव तर तेथून केव्हांच नेलें होतें ! त्या भयाण दिसणाऱ्या नदीकिनाऱ्यावर विनोदिनी आणि वृद्धकाका हीं दोघेंच राहिलीं होतीं. मालतीचें शव ज्या ठिकाणीं ठेवलें होतें, त्या मातींत तिच्या साऱ्या अवयवांचा ठसा उमटला होता. नदीच्या एका प्रवाहाबरोबर ती खूण केव्हांच वाहून गेली असती ! पण काकांच्या हृदयाला झालेली खोलवर जखम कशानेंही बरी होणें अशक्य होतें.

× × ×

घरीं आल्यावरही 'पापाचें प्रायश्चित्त मृत्युच आहे' हे जगन्नाथाचे उद्गार विनोदिनीला राहून राहून अस्वस्थ करीत होते. 'असल्या भावनाशून्य माणसाशीं आपण विवाह करणार होतों, ही कल्पनाच तिला आतां सहन होईना. जगन्नाथाशीं लग्न करण्यांत आपण केवढी चूक करीत होतों याचें तिला आतां प्रत्यंतर आलें होतें. त्याच्याशीं आपलें जडूं पहाणारें सहचरीचें नातें तिनें मनांतून केव्हांच उखडून टाकलें होतें. आतां प्रत्यक्ष तसें जगन्नाथला सांगावयाचें राहिलें होतें आणि तशा संधीचीच ती वाट पहात होती !

अशी संधी तिला दुसऱ्याच दिवशीं लाभली !

सकाळीं चहा वगैरे झाल्यावर आदल्या दिवशीचा प्रकार विसरून जा, असें सांगण्याकरतां जगन्नाथ तिच्या खोलींत आला !

आपलें मनोगत त्याला कसें काय सांगावें या विचारांत विनोदिनी चूर होती! आपल्या आणि त्याच्या ताटातुटीच्या प्रसंगाच्या जाणीवेनें तिचें अंतःकरण अतिशय व्यथित झालें होतें! ती जें करणार होती, त्यांत तिला आनंद मुळींच वाटत नव्हता; पण, तें केल्याशिवाय—जगन्नाथला तसें स्पष्ट सांगितल्याशिवायही आपल्याला अन्य मार्ग नाहीं अशी तिच्या मनाची मनोमय खात्री झाली होती! आपल्याच हातानें आपण आपल्या प्रेमाचा मृत्यु घडवून आणित आहोंत याची तिला जाणीव होती! देहाच्या मृत्युनें मालती सुखी झाली होती—आपल्या जगन्नाथावरील प्रेमाच्या मृत्युनें आपण सुखी होऊं असें विनोदिनीच्या मनानें घेतलें होतें.

आणि अशा या विचारचक्रांतच जगन्नाथ आपल्या खोलींत केव्हां आला हें तिला कळलें नाहीं!

त्याच्या कढत कढत हाताचा स्पर्श आपल्या खांद्याला झाल्यावर विनोदिनी एकदम चपापली! हळूवार हातानें तिनें आपल्या खांद्यावरील जगन्नाथाचा हात दूर केला! पुढच्या पवित्र्याची जणूं ती पहिली सलामी होती!

आणि मालतीच्या मृत्युबाबत पुन्हां जगन्नाथनें पूर्वीसारखेंच भाष्य केलें, तेव्हां आपल्याला आपला बेत पार पाडण्यास हीं नामी संधि आहे असें विनोदिनीला वाटलें. तिनें एकदम सुरुवात केली!

" तुम्ही जर मालतीच्या जागीं असतात—तारुण्यसुलभ मोहानें तुमच्यावर जर असेंच मोहिनी अस्त्र फेकलें असतें, तर तुम्ही नसता त्या मोहाला बळी पडलात!"

विनोदिनीच्या त्या उघड आणि सरळ सरळ प्रश्नानें जगन्नाथ अगदीं थंडच झाला! आपल्याला हा प्रश्न विचारणारी ही विनोदिनीच आहे का, अशी पुसट शंका त्याच्या मनांत आली! आणि

म्हणून तो म्हणाला, "बिनोदिनी, पापाला जर असें आपण उत्तेजन देऊं लागलों, तर पाप कमीं होईल कीं—"

जास्ती ? कुमार्गी तरुणींबरोबरच जर तरुण विवाह करूं लागले, तर मग निष्पाप कुमारिकांना कोणीच वाली उरणार नाहीं !

जगन्नाथाच्या या युक्तिवादानें बिनोदिनीच्या मनांतून तो आणखीच उतरला. त्याच्याशीं जास्त वादविवाद घालण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें ठरवून तिनें एकाच स्पष्ट शब्दांत आपला दोघांचा ठरलेला विवाह मोडल्याचें त्याला सांगितलें ! तें सांगतांना बिनोदिनीच्या शब्दांतील आर्तता, एका प्रकारच्या विलक्षण दुःखाचा उठणारा कंप जगन्नाथाला जाणवल्याशिवाय राहिला नाहीं ! तिच्या शब्दांनीं तो अगदीं आश्चर्यचकित झाला !

'आपला दोघांचा ठरलेला विवाह मोडला' हें सांगितल्यावर आपल्या डोळ्यांत येणाऱ्या अश्रूंची वाट लावण्याकरतां बिनोदिनीनें आपले डोळे झाकून घेतले. दोन्ही हात वर झाल्यामुळें विरलवस्त्राच्या तिच्या ब्लाऊजमधून उन्नत झालेला तिचे उरोज त्याला दिसले !

क्षणभरच त्याला वाटलें...................वाटलें बिनोदिनीला आपल्या हृदयाशीं घट्ट धरून तिच्या रसरशीत ओठांचें मनसोक्त चुंबन घ्यावें ! पण दुसऱ्याच क्षणीं त्यानें आपला मोह आवरला !

असा विचार आपल्या मनांत आल्याबद्दल त्याची त्यालाच लाज वाटूं लागली ! मोह ! केवढी भयंकर शक्ती आहे ही ! आणि या क्षणिक मोहानेंच...............

मालतीचा—गौरीचा बळी घेतला होता ! आपल्याला अज्ञात असलेल्या कित्येक स्त्री-पुरुषांच्या आयुष्याचें या मोहाच्या पायींच उन्हाळे झाले होते !

त्याच मोहाच्या तावडींत आपण आज सांपडत होतो !

विनोदिनीचें—एका निष्पाप कुमारिकेचें आपण चुंबन घेणार होतों !

आणि तेही केव्हां तर आपला दोघांचा ठरलेला विवाह मोडला असें तिनें निश्चयपूर्वक निक्षून सांगितल्यावर ! बागेंतील तो पहिला मोहाचा प्रसंग !

आणि आजचा दुसरा !

मोहाच्या प्रखर आणि सूप्तशक्तीची त्याला आज त्याच्या आयुष्यांत इतक्या निकटतेनें प्रथमच जाणीव झाली होती !

आणि म्हणूनच विनोदिनीच्या शब्दांवर प्रत्युत्तर न करतां जगन्नाथ ताडकन खोली बाहेर पडला !

त्याचवेळीं विनोदिनीचे लक्ष बागेंतलि एका पांढऱ्या शुभ्र संगमरवरी पुतळ्याकडे वेधलें !

तो पुतळा एक भावना शून्य—बोलून चालून दगडाचा होता !

'आणि जगन्नाथ ? पापपुण्याच्या खोट्या कल्पनांनी साधी माणुसकीही नष्ट झालेला—तोही एक चालतां बोलतां पुतळाच नव्हे तर काय ?

असहिष्णुता,-निर्विकारता,-भावनाशून्यता या गुणत्रयींनीं जगन्नाथ जणूं त्या दगडी पुतळ्याशीं स्पर्धाच करीत आहे, असें विनोदिनीला वाटलें !

जगन्नाथ निघून गेल्यामुळें तिच्या आशेचा अखेरचा तंतूही तुटून गेला ! आपण त्याचें परिवर्तन करूं अशी वेडी आशा विनोदिनीच्या हृदयांत अगदीं एका कोपऱ्यांत दबा धरून बसलेली होती ! स्त्री होती ती ! पण अशा रितीनें तिच्या आशेचा आज चक्काचूर झाला होता !

अशाच विषण्ण मनःस्थितींत ती कांहीं वेळ बसून राहिली !

पुन्हां खोलीच्या बाहेर जातांना आपल्या पायांतील शक्तीच नष्ट झाल्याचा तिला क्षणभर भास झाला !

बागेंतील तो संगमरवरी पुतळा तिच्या डोळ्यापुढून कांहीं केल्या हलेना !

अशा संभ्रमलेल्या मनःस्थितींतच तिनें अत्यंत व्यथित अंतःकरणानें जगन्नाथानें तिच्या बोटांत घातलेली हिऱ्याची आंगठी बोटांतून काढून टेबलावर ठेवली !

आपल्या हृदयाचा एक लचकाच कोणीतरी तोडून नेल्याचा तिला भास झाला !

इतका वेळ दबून राहिलेलें तिच्यांतील स्त्रीत्व आतां एकदम उसळी मारून बाहेर आलें ! आपल्या कॉटवर पडून व उशींत तोंड खुपसून ती एखाद्या हतबल स्त्रीप्रमाणें रडूं लागली !

— ६ —

ज्या घरीं आपण लहानाचे मोठें झालों—अर्धें आयुष्य घालविलें तें घर—माईसाहेबांचा तो प्रेमळ आसरा सोडून जाण्याच्या निश्चयानें विनोदिनीच्या अंतःकरणाला अतिशय वेदना होत होत्या; पण कोणत्याही कारणानें आतां माघार म्हणून घ्यावयाची नाहीं असा तिनें ठाम निश्चय केला होता.

जगन्नाथाच्या मनाची स्थिति अतिशय विकल झाली होती ! आपण करतों तें बरोबर कीं चूक याचा त्याचा त्यालाच निर्णय देतां येईनासा झाला होता ! त्याचें एक मन म्हणे 'तत्त्वाकरतां तूं सख्ख्या भावाची पर्वा केली नाहींस, तो एका उपऱ्या मुलीकरतां तत्त्वभ्रष्ट होऊं पहातोस '!

दुसरें मन म्हणें 'कसलें आलें आहे तत्त्व ?' तुला विनोदिनीचा

सहवास हवासा वाटतो. तुझ्या तरुण हृदयांत आवेगानें ज्या उर्मी उठत आहेत त्यांना असें जबरदस्तीनें दाबून काय होणार आहे' ?

अशा द्विधा मन:स्थितींतच त्यानें सकाळीं उठल्यापासून दुपारीं जेवण होईपर्यंतचा वेळ घालविला ! अद्यापपर्यंत त्यानें माईसाहेबांना या गोष्टीचा थांगपत्ता लागू दिला नव्हता आणि म्हणूनच जेवणाकडे त्याचें लक्ष नाहींसें पाहून माईसाहेबांना आश्चर्य वाटलें !

बिनोदिनीनें आपल्याशीं विवाह करण्याचा आपला बेत बदलला आहे हें माईसाहेबांना कसें सांगावें याच्या विचारांतच जगन्नाथ चूर होता. आणि म्हणूनच माईसाहेबांनीं पुन्हां त्याला तोच प्रश्न विचारला, तरी त्याचें तिकडे लक्षच गेलें नाहीं.

बिनोदिनीच्या त्या निश्चयानें जगन्नाथचें स्वाभिमानी मन दुखावले गेलें होतें ! तरी त्याला आशा होती कीं बिनोदिनी परत येईल आपली क्षमा मागेल व आपला बेत बदलल्याचें सांगेल !

पण त्याला स्त्रीहृदयाची खरी कल्पना अद्याप आली नव्हती ! आणि इकडे बिनोदिनीलाही वाटत होतें कीं, जगन्नाथ आपली चूक कबूल करील आणि रूळावरून घसरलेली गाडी पुन्हां रुळावर येऊन पूर्ववत चालू लागेल !

पण शेवटीं जगन्नाथ व बिनोदिनी या दोघांच्याही आशा पुऱ्या झाल्या नाहींत !

जगन्नाथाचा व माईसाहेबांचा निरोप घेऊन घराबाहेर पडावयाचें असें बिनोदिनीनें आपल्या मनाशीं पूर्णपणें ठरवून टाकलें.

आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं माईसाहेबांचा निरोप घेण्यास म्हणून ती त्यांच्या खोलींत शिरली, तरी त्यांना आपला बेत कसा काय सांगावा याबद्दल तिच्या मनाचा निश्चय झाला नव्हता. आयत्या वेळीं सुचेल तें करावयाचें असें तिनें ठरविलें होतें !

बिनोदिनी माईसाहेबांच्या खोलींत गेली त्यावेळीं त्या पाठमोऱ्या

बसल्या होत्या. आपली त्यांची आतां कायमचीच ताटातूट होणार त्याचें हें प्रतीकच आहे असा तिला भास झाला. क्षणभरच तिच्या मनाची चलबिचल झाली !

माईसाहेबांना त्यांच्या बिचाराच्या समाधींतून जागें करूं नये म्हणून ती आल्यापावलीं मागें फिरणार तोंच माईसाहेबांचे तिच्याकडे लक्ष गेलें.

जगन्नाथनें बिनोदिनीच्या निश्चयाची वार्ता त्यांच्या कानावर घातली होती आणि त्याबद्दल त्यांना मनस्वी वाईट वाटत होतें !

'त्यावेळीं प्रभाकर घराबाहेर पडला आणि आज बिनोदिनी त्याच्याच पावलावर पाऊल टाकणार होती !

याबद्दल याला कारण जगन्नाथ !

मग, यांत चूक कोण आणि बरोबर कोण' ?

आपल्या या विचारतंद्रींतून माईसाहेब भानावर आल्या त्या विनोदिनीच्या शब्दानींच !

अगदीं मोजक्याच शब्दांत तिनें त्यांना आपला निश्चय व त्या मागची कारणपरंपरा सांगितली !

एकमेकांच्या विचारसरणींत इतकी तफावत आहे तरी त्यांचा संसार सुखाचा होणारच नाहीं अशी त्यांच्या सनातनी मनाची पटेना !

त्यांना वाटत होतें ' आपल्या विवाहाच्या वेळीं आपल्या पतींना कोठें होती आपली माहिती ? मग आपला संसार काय दुःखाचा झाला ?

धृतराष्ट्र अंध असूनही त्यानें नाहीं का गांधारीशी संसार केला ? दुष्ट का होईनांत पण शंभर पराक्रमी मुलांना जन्म दिला ?'

पण त्यांना काय माहित कीं आतांचें जग धृतराष्ट्र-गांधारीचें राहिलेलें नाहीं !

त्यांनीं आपली ही विचारसरणी विनोदिनीच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना कसलेंही प्रत्युतर न करता विनोदिनीनें आपला निश्चय आतां बदलणार नाहीं असें निश्चयपूर्वक त्यांना सांगितलें !

थोड्याच वेळानें ती बाहेर पडली त्यावेळीं तिच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. जातांना तिनें माईसाहेबांनीं सोडलेला दीर्घ सुस्कार ऐकला होता !

त्याच दिवशीं संध्याकाळीं तिनें जड अंत:करणानें जगन्नाथाचाही निरोप घेतला ! त्या क्षणीही तिला जगन्नाथच्या मनाचें परिवर्तन होईल असें वाटलें—व्हावें अशी अपेक्षा होती, पण तसें कांहींच झालें नाहीं ! बागेंतील संगमरवरी पुतळ्या इतकाच तोही शांत—निश्चल होता !

आणि याच गोष्टीची विनोदिनीला चीड येत असे !

× × × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनें विनोदिनी मुंबईस आली. त्यावेळीं कोठें उतरावयाचें, काय करावयाचें, याबद्दल तिनें कांहींच ठरविलें नव्हतें. कसेंही करून त्या घरापासून दूरदूर जावयाचें एवढेंच तिला माहित होतें ! मुंबईस गेल्यावर प्रभाकरला भेटण्याचें तिनें ठरविलें होतें ! पण त्याचा पत्ता त्यानें केव्हांच कुणालाही कळविला नव्हता ! आपल्या त्या शहरवजा खेड्यांत राहिल्यामुळें तिला शहरी वातावरणाची फारशी कल्पना नव्हती !

तिच्या एका दूरच्या आत्याला भेटण्याकरितां ती एकदांच काय ती मुंबईला बऱ्याच वर्षापूर्वी आली होती !

त्या अफाट शहरांत कोणाची ओळखदेखील नाहीं, जवळ फारसे पैसे नाहींत, अशा विचित्र परिस्थितींत विनोदिनी सांपडली होती ! जवळचे पैसे संपत आल्यामुळें आतां तिला ती उतरलेल्या

हॉटेलांतून बाहेर जाण्याची पाळी आली होती ! पण दैवानेंच तिची हांक ऐकली !

एके दिवशीं सकाळीं बाथरुममध्यें स्नानाला जात असतांना जिन्यावरच पायऱ्या चढून येत असलेल्या एका उमद्या तरुणाकडे तिचें लक्ष गेलें ! त्याला आपण पूर्वी कोठेंतरी पाहिले असावें असें तिला राहून राहून वाटत होतें ! पण त्याच्या चेहेऱ्याकडे निरखून पहाण्याचे तिला धैर्य झालें नाहीं ! दुपारीं जेवण झाल्यावर तिला आठवले कीं, तो तरुण गृहस्थ एकदां केव्हांतरी जगन्नाथाकडे आला होता आणि तो एक उत्कृष्टपैकीं चित्रकार आहे !

आपल्या घरांतील बाबासाहेबांचें एनलार्जमेंट ही त्यानेंच तयार केल्याचें तिला आठवलें आणि म्हणूनच दुपारीं तिनें त्या तरुणाची भेट घेण्याचें ठरविलें !

× × × ×

गुरुनाथ दुपारचा चहा घेऊन आपल्या खोलींत ' टाईम्स ' चाळत बसला होता. तो एक प्रख्यात चित्रकार होता, आणि आपलें नशीब पहाण्याकरितां मुंबईस आला होता.

थोड्याच वेळानें त्याला आपल्या दारावर कोणीतरी टिचक्या मारीत आहे असें वाटले म्हणून त्यानें दरवाजा उघडला आणि विनोदिनीला तेथें उभी असलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें ! सकाळीं जिन्यांत त्यानें तिला पाहिलेली होती आणि यापूर्वी आपण या तरुणीला कोठेंतरी पाहिली आहे असा भास त्यालाही झाला होता !

त्याला फारसा विचार करावयास वेळ न देतांच विनोदिनीनें आपण कोण, मुंबईत कां आलों याची माहिती सांगितली !

वास्तविक तिला गुरुनाथाची मुळींच माहिती नव्हती, पण त्या-वेळीं ती अशा कांहीं विचित्र परिस्थितींत सांपडलेली होती कीं, कोणाच्या तरी आश्रयाची तिला फारच जरूरी होती !

आणि गुरुनाथलाही विनोदिनीचा अशा रितीनें झालेला परिचय मोठा शुभसूचक वाटला !

दोघांनीही एकमेकाला साहाय्य करण्याचें कबूल केलें. दोनचार दिवसांच्या अवधींतच गुरुनाथनें दादरला दोन खोल्यांचा एक ब्लॉक घेतला व तेथें तीं दोघेही रहावयास गेली !

'गुरुनाथाच्या संनिद्ध रहाण्यांत-आपण चूक तर करीत नाहीं ना' अशी पुसट शंका विनोदिनीच्या मनाला मधूनच चाटून जाई ! पण गेल्या पंधरा दिवसांतील गुरुनाथचें तिच्याशीं इतक्या सभ्यपणाचें वर्तन होतें कीं, तिच्या मनांतील शंका फार काळ टिकूनच रहात नसे !

आणि खरोखरच गुरुनाथही आपल्याकडून अत्यंत जपून होता. तो तरूण होता— विनोदिनीसारखी एक कुमारिका त्याच्या खोलींत रहात होती—ती त्यावेळीं असहाय्य होती. तरीसुद्धां तिच्या परिस्थितीचा गैरफायदा घेण्याची दुष्ट कल्पना त्यांच्या मनांत कधींच आली नाहीं.

त्याच्या मनांत-कधींकधीं येत असे 'विनोदिनीचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवून आपण एखादें तैलचित्र तयार केलें तर ती एक अत्यंत सुंदर कलाकृती होईल!' पण हा साधा विचारही तिच्याजवळ बोलून दाखविण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं !

शेवटीं एक दिवस विनोदिनीनेंच काढलेल्या एका विषयावरून सहज बोलतां बोलतां पण तितकेंच भीतभीत त्यानें आपल्या मनांतील विचार तिला सांगितला !

विनोदिनीला आपला विचार कितपत रुचेल याबद्दल गुरुनाथच्या मनांत दाट शंका होती ! त्याच्या प्रश्नानें विनोदिनी मुळींच बिचकली नाहीं, उलट गुरुनाथाच्या उपकाराची फेड आपणांस अशा रितीनें करतां येत असलेली पाहून तिला बरें वाटलें !

बऱ्याच दिवसांनीं आज तिला प्रथमच आनंद झाला होता!

आतां जगन्नाथाला ती विसरून गेली! गुरूनाथ हेंच तिचें आतां सर्वस्व होतें!

सतत एक महिनाभर परिश्रम घेऊन गुरूनाथला आपल्या मनासारखें चित्र पुरें करतां आलें!

विनोदिनीचें ते बोलके डोळे, ते एका विशिष्ट ठेवणीचे ओठ व तिची बांधेसूद शरिरयष्टी याचें त्यानें हुबेहूब चित्रण केलें होतें!

आपली ती प्रतिमा पाहून विनोदिनीला अत्यानंद झाला! यापूर्वी तिनें अनेकदां आपलें सौंदर्य आरशांत निरखून पाहिलें होतं! आपल्या सौंदर्याबद्दल तिला पुरेपूर अभिमान होता. पण त्या प्रतिमेंतील आपलें तें सौंदर्य पाहून विनोदिनी क्षणभर सिस्मित झाली!

कोणालाही हवेहवेसें वाटावें असेंच तिचें सौंदर्य होतें! त्या सौंदर्यांत कसलाही उन्माद नव्हता! ओढ्यांतून वाहणाऱ्या पाण्याचा खळखळाट तेथें नव्हता, नदीचे धीर गंभीर जल ज्याप्रमाणें आकर्षक असतें तसेंच तिचें सौंदर्य होतें! चित्र तयार करण्याला लागलेल्या महिनाभराच्या अवधींत तिचें मन न दुखावेल अशा बेताबेतानें गुरूनाथनें तिच्याकडून तिची सर्व हकीकत काढून घेतली आणि 'तूं केलेस तें अगदीं बरोबर केलेस' या गुरूनाथच्या उद्गारांनीं तिच्या मनांतील जगन्नाथाविषयींच्या सुप्त विचारशक्ती पुन्हां एकदां जागृत झाल्या!

स्वाभाविकच तिचें मन गुरुनाथ आणि जगन्नाथ यांची तुलना करूं लागले!

जगन्नाथ तिला भावनाशून्य असा संगमरवरी पुतळा वाटत होता!

आणि गुरुनाथ? अतिशय भावनाप्रधान, दुसऱ्याच्या सुखदुःखाशीं समरस होणारा एक तेजस्वी तरुण होता!

इतकें असूनही जगन्नाथाविषयीं जिच्या अंतःकरणांत असलेली एक प्रकारची ओढ तिच्या मनांत खुपत होती !

या विचारशक्तींना दडपून टाकण्यासाठीं म्हणून ती या नव्या वातावरणाशीं अतिशय तन्मयतेनें समरस होण्याची पराकाष्ठा करीत होती !

गुरुनाथ तिला आवडत होता ! त्याच्या कलेवर तर ती बेहद्द खूष होती ! त्याचीं मतें अत्यंत उदारमतवादी होतीं ! सनातनत्त्वाचा त्याच्या बोलण्याला कोठें वासही येत नव्हता, पण त्याचबरोबर तो उच्छृंखलही नव्हता. या सर्व गोष्टीमुळें तिच्या अंतकरणांत जगन्नाथा-विषयींचें प्रेम जरी खोल दडी मारून बसलें होतें तरी दिवसेंदिवस गुरुनाथकडे ती जास्त जास्त आकृष्ट होऊं लागली होती !

तिच्यांतील नैसर्गिक भावना एकसारख्या बंड करून उठत होत्या. गुरुनाथाविषयींच्या सतत विचारांनीं तिच्यांतील विकार कधीं कधीं जागृत होत असत !

अशाच एके दिवशीं चाकूनें कांहीं काम करीत असतां त्याच्या आंगठ्याला फार मोठी जखम झाली ! विनोदिनीच्या डोळ्यांत चटकन् पाणी आलें ! तिनें आपल्या हातरुमालानें त्या आंगठ्याची जखम बांधून टाकली ! त्यावेळीं तिच्या हाताच्या होणाऱ्या स्पर्शानें गुरुनाथाच्या आंगांतून एक गोड चमक गेली ! जखम बांधून झाली तरी गुरुनाथनें तिचा हात सोडला नाहीं ! तिच्या रेशमासारख्या मऊ मऊ हाताचा त्याला विलक्षण मोह पडला होता ! विनोदिनीनेंही त्याच्या हातांतील आपला हात काढून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं ! जगन्नाथाच्या सहवासांत आजपर्यंत कधींही न अनुभवलेलें असें गोड गोड सुख ती आज अनुभवीत होती !

अशा या संभ्रमलेल्या मनःस्थितींच त्याचे ते अत्यंत मोहक व रससशीत ओंठ आपल्या ओठांवर कधीं टेकले गेले हें तिला कळलें—

सुद्धां नाहीं. तिला तें हवें होते, आणि नको असतें तरी त्याला दूर लोटण्याची शक्ति तिच्या मुग्ध झालेल्या त्या गात्रांत आतां राहिली नव्हती !

तिच्या मनाप्रमाणेंच तिच्या देहावरही आतां गुरुनाथनें पूर्णपणें ताबा मिळविला होता. थोड्याशा लांब असलेल्या तिला त्यानें जवळ ओढून घेतले व तिच्या लुसलुशीत ओठांचे, गालाचें मनसोक्त चुंबन घेतलें ! त्याच्या त्या कृतींतील आतुरता तिला पुरेपूर कळली होती! गुरुनाथ व विनोदिनी यांच्यांतील नैसार्गिक व तारुण्यसुलभ भावनांनीं केलेल्या बंडाचा हा असा परिपाक झाला होता. दोघांनाही तो हवाहवासा वाटत होता !

बाहेर पश्चिमेला सूर्यनारायणही आपल्याइतक्याच उत्कंठतेनें संध्यादेवीच्या भेटीला त्वरेनें जात असलेला त्या दोघांना दिसला !

× × × ×

विनोदिनीला गुरुनाथ हवाहवासा वाटला तरी त्याच्याशीं आपण विवाहबद्ध व्हावें असें तिला वाटत नव्हतें ! तिची मनोदेवता तिला त्या विचारापासून एकसारखी मागें खेचीत होती.

जगन्नाथाला विसरुन जाण्याकरतांच ती गुरुनाथाच्या आयुष्याशीं जास्तजास्त समरस होत चालली होती. विसरूं म्हटलें तरी तिला जगन्नाथाची आठवण पूर्णपणें विसरणें अशक्य झालें होतें.

गुरुनाथाला पक्की खात्री होती कीं, आजना उद्यां विनोदिनी आपल्याशीं विवाह करण्यास कबूल होईल.

पण दैव ? तें निराळाच डाव टाकण्याच्या पावित्र्यांत उभें होतें. त्या दैवानेंच त्या दोघांवर एक दिवस असा आघात केला कीं, तिला त्याची जन्मभर आठवण राहिली !

एके दिवशीं एक नवीनच लागलेला व उत्कृष्ट म्हणून नांवाजलेला बोलपट पहाण्यास ती रात्रीची गेली. त्या बोलपटांतील एकेक

उन्मादकारक प्रसंग पाहून दोघांच्याही वृत्तींत चलबिचल झाली. दोघानांही वाटलें जणूं आपल्या आयुष्यावरच या बोलपटाच्या कथानकाची उभारणी केली आहे! आणि बोलपट संपण्याच्या वेळींच अचानक आलेल्या मुसळधार पावसानें दोघांचाही दावा साधला!

थिएटरच्या बाहेर जी थोडीफार वाहनें शिल्लक होती तीं भरमसाट पैसे देऊन श्रीमंत प्रेक्षकांनीं केव्हांच नेली होती! आणि अर्धा तास वाट पाहूनही जेव्हां पाऊस मुळींच कमी होण्याचें चिन्ह दिसेना, तेव्हां नाईलाज म्हणून भिजतच जाण्याचें त्या दोघांनीं ठरविलें! त्यानें आपला ब्लेझरचा जाड कोट तिच्या आंगाभोंवती लपेटला! थोड्याशा भिजलेल्या आपल्या शरिराला त्यांच्या हाताच्या झालेल्या स्पर्शानें तिला अननुभूत आनंद झाला!

सुमारें अर्ध्या एक तासाच्या चालीनंतर दोघेही आपल्या बिऱ्हाडीं आलीं! गुरूनाथनें बॅटरीच्या सहाय्यानें उजेड पाडून दरवाजा उघडला व दोघेंही आंत गेलीं!

आंगावर जाड ब्लेझरचा कोट असूनही विनोदिनी अक्षरशः ओलिचिंब झाली होती!

आंगांतील कोट काढून ती पाठमोरी झाली तेव्हां गुरुनाथाला त्या विग्व्यात 'ओलेती' चित्राची आठवण झाली! तिच्या विरलपोलक्यांतून दृग्गोचर होणारी तिची गौरवर्ण पाठ गुरुनाथला फारच मोहक वाटली!

पाठीमागूनही अस्पष्टपणें दृग्गोचर होणारा तिचा उन्नत उरोभागही त्याला पुनः पुन्हा पहावासा वाटत होता! तिचे ते पुष्ठनितंब आपल्याला तिच्या जवळ जवळ खेचींत आहेत, असा त्याला भास झाला! विनोदिनीनें झटकन आंगांतील कोट काढला आणि तिनें गुरुनाथकडे तोंड वळविलेंमात्र; ती एकदम चमकली! क्षणभरच

त्याच्या खोल पण टपोऱ्या डोळ्यांत तिला एक निराळीच भावना वास करीत आहे असें वाटलें !

तिच्या सौंदर्याचें आकंठ पान करण्यांत गुंग असलेल्या गुरुनाथावर मोहाचा अधिक अधिक पगडा बसत चालला होता ! तिच्या पोलक्यांतून डौलानें वर मान केलेले तिचे उन्नत उरोज त्याला त्यावेळीं फारच कमनीय वाटलें !

अशा या गुंगावलेल्या मोहानें पूर्ण भारावलेल्या मनःस्थितींच त्यानें तिला झटकन आपल्याकडे ओढून हृदयाशीं घट्ट धरलें व तिचें दीर्घकालपर्यंत चुंबन घेतलें !

तिच्या त्या उन्नत उरोजाचा दाब त्याला फारच सुखावह वाटत होता !

क्षणभरच दोघेही अशा भारावलेल्या मनःस्थितींत होतीं !

क्षणभरानें गुरुनाथाचे हात दूर करून विनोदिनी त्याच्यापासून दूर झाली !

दोघानींही खिडकींतून बाहेर पाहिलें ! पर्जन्यवृष्टी आतां पूर्णपणें थांबून आकाशांत चंद्राची कोर आपल्या त्या लुकलुकित तेजानें विलसत होती !

त्या चंद्रकोरेइतकीच विनोदिनी सुंदर आहे असा विचार गुरुनाथच्या मनांत आला !

त्यानें घेतलेल्या चुंबनानें विनोदिनीला राग मुळींच आला नव्हता. उलट जगन्नाथाच्या सहवासांत मिळालें नव्हतें त्याची प्राप्ती गुरुनाथाकडून झाल्यामुळें त्याच्याबद्दल तिचें आकर्षण अधिकच वाढलें !

गुरुनाथानें सर्व खिडक्या बंद केल्या ! विनोदिनीही आपल्या आंतील खोलींत गेली ! तिनें आंतून दाराला कडी लावतांना झालेला आवाज गुरुनाथला ऐकूं आला ! तिनें दार लावलें हेंच बरें केलें असें त्याला वाटलें !

आपल्या खोलींत आल्यावर विनोदिनीनें आपलें ओलें झालेलें पातळ बदललें व ती दिवा मालवून आपल्या कॉटवर अस्वस्थ मनःस्थितींतच पडली.

गुरुनाथच्या थोड्या वेळापूर्वींच्या त्या कृत्यानें तिच्यांतील बंड करून उठणाऱ्या. पण वेळोंवेळीं त्यांना आवरणाऱ्या विनोदिनीच्या मनांत विचारांचें काहूर उठलें होतें !

तशा त्या मध्यरात्रीच्या वेळींही शेजारच्या बिऱ्हाडांत लावलेल्या फोनोग्राफमधील गाणें तिला ऐकूं येत होतें ! 'दहा वाजतां' या प्रभात चित्रांतील 'तो' आणि 'ती'चें तें प्रेमगीत होतें !

ती म्हणाली, 'प्रेम म्हणजे दो जीवांची एकता'

तो म्हणाला, 'होय ना मग कां अशी ही दूरता'

हे घोळून घोळून म्हटलेले चरण तिच्या कानांवर एकसारखे आघात करीत होते !

'प्रेम म्हणजे दो जीवांची एकता' या वाक्यानें तिच्या मनांत विचारांचा कल्लोळ उठला !

आपलें गुरुनाथवर प्रेम आहे आणि आपण त्याच्याशीं लग्न करावयाचें असा तिनें त्याच क्षणीं आपल्या मनाशीं निश्चय केला ? बाहेरून 'होय ना मग कां अशी ही दूरता' हा काव्यचरण गुरुनाथ घोळून घोळून म्हणत आहे असा तिला भास झाला ! आणि तो भास नव्हता ! दोघांच्या मनोव्यापारांचीं ती अचानक झालेली सांगड होती ! या योगायोगानें विनोदिनीला आश्चर्य वाटलें !

अशा विकल मनःस्थितींच थोड्यावेळानें तिनें 'गुरुनाथ' अशी आर्तस्वरानें हांक मारली ! बाहेरच्या खोलींतील कॉटचा झालेला करकर असा आवाज व गुरुनाथनें दिवा लावतांना झालेल्या बटनाचा खटकन आवाज तिला ऐकूं आला !

तशा त्या मोहावलेल्या स्थितींतच ती चटकन उठली व तिनें आंतून लावलेली कडी काढली !

सिनेमाहून परत आल्यावर थोड्याच वेळानें आपलें चुंबन घेतल्यावर गुरुनाथच्या डोळयांत ज्या भावनेची तिला चमक दिसली— होती तीच भावना—तीच इच्छा आपल्याला त्याच्याकडे आकर्षून घेत आहे असें तिला वाटलें !

मगाशीं ती त्या डोळ्यांकडे पाहून मनांतून भेदरली होती ! आणि आतां ? आतां त्याच्या डोळ्यांतील ती अतृप्त इच्छा कायम असल्याचें पाहून तिला बरें वाटलें ! एक क्षणभरच जगन्नाथाची मूर्ती आपल्या डोळ्यापुढें वावरत असल्यासारखें तिला वाटलें !

' विनोदिनी मागें फीर ' असेंच तो आपल्याला आर्तस्वरानें ओरडून सांगत असल्याचा तिला भास झाला !

पण दुसऱ्याच क्षणीं जगन्नाथच्या ऐवजीं गुरुनाथाची ती हंसरी छबी तिला दिसली !

त्याच्याविषयीच्या आकर्षणानें ती आतां पुरेपूर भारावली होती. तिच्या डोळ्यांतील ती वासना अतृप्तीची उर्मी गुरुनाथनेंही ओळखली होती !

त्यानें थरथरणाऱ्या हातानें विनोदिनीचा हात आपल्या हातांत घेतला व तिला बाहेर आपल्या खोलींत आणलें !

दोघांच्याही मनांतील भीतिचा—संकोचाचा पडदा केव्हांच दूर झाला होता !

बंद असलेल्या खिडकींतूनही ' प्रेम म्हणजे दो जिवांची एकता' हें काव्यचरण दोघानांही ऐकूं आलें !

गुरुनाथला ' आपण तुझ्याशीं लग्न करणार ' असें विनोदिनीनें सांगितलें !

'उद्यां आपल्या दोघांचा विवाह झाल्यावर आपण जें करणार तें आतांच केलें तर त्यांत कसलें आलें आहे पाप' असा दोघांच्याही मनांत एकाच वेळीं विचार आला व दोघांनीही तो एकमेकांना बोलून दाखविला!

हळूच उठून गुरुनाथनें दिवा मालविला!

आणि त्या अंधारांत आगोदरच मनानें एक झालेले ते दोन जीव शरिरानेंही एक झाले!

— ७ —

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजून गेले तरी गोड सुखस्वप्नांच्या गुंगींतच गुरुनाथ आणि विनोदिनी झोंपली होतीं! चाळींतील इतर लोकांचे व्यवहार नित्यनेमानें चालूच होते! त्यांच्या त्या गड-बडीमुळेंच नऊ वाजण्याच्या सुमारास प्रथम गुरुनाथ जागा झाला!

आपल्या पलंगावर शेजारींच विनोदिनी झोपलेली त्याला दिसली! तिला अगदीं शांत झोंप लागली होती! वासनातृप्तीची झांक तिच्या डोळ्यांत त्याला दिसली! झोपेंत अस्ताव्यस्त झालेले तिचे केस सारखे करण्यासाठीं म्हणून गुरुनाथ खालीं वाकला! त्याच्या गोड स्पर्शानें विनोदिनी जागी झाली तरी तिनें त्याचा हात आपल्या हातांत घट्ट धरून ठेवला होता! जणूं कांहीं तो तिच्यापासून कोठें तरी दूर पळून जाणार होता! त्याचा हात घट्ट हातांत धरून ती उठली! आदल्या रात्रीं झालेल्या त्या प्रकारानें तिच्या गात्रांना एकप्रकारची शिथिलता आली होती! तिला हवें होतें तें मिळालें होतें, पण त्या-तूनच कांहीं भयंकर प्रकार निर्माण होणार नाहीं ना अशा शंकेनें तिचें मन व्याकूळ झालें. आणि त्याचबरोबर तिला पहांटे पडलेल्या त्या भयंकर स्वप्नाची आठवण झाली!

'गुरुनाथ आपल्याशेजारींच झोपला आहे. त्याचे हंसरे डोळे

आपल्याकडे पाहून हंसत आहेत व आपल्याला जणूं बजावीत आहेत कीं विनू तूं माझी आहेस—मी तुझा आहे. इतक्यांत एक आक्राळ विक्राळ पुरुष आला व त्यानें आपल्या हातांतील जाडशा दोरीचा फांस गुरुनाथच्या गळ्याभोंवतीं टाकला ! अचानक बसलेल्या फांसानें गुरुनाथाचा जीव आंतल्या आंत गुदमरूं लागला ! यमदूतांनीं सत्य-वानावर फांस टाकल्यानंतर त्याची जी स्थिति झाली त्याचेंच हुबे-हुब चित्र डोळ्यापुढें तिला दिसलें. एक अस्फुट किंकाळी गुरुनाथा-च्या तोंडांतून बाहेर पडली आणि त्याचे पंचप्राण त्याची कुडी सोडून निघून गेले ! भयंकर जोरानें ओरडावें असें आपल्याला वाटत असूनही आपल्याला ओरडतां येईना, आपली सर्व शक्ति नष्ट झाली आहे असें आपल्याला वाटलें ! क्षणभरानें आपण स्वप्नांतून जागे झालों व चटकन शेजारी पाहिलें तोंच ते गुरुनाथचे हंसरे डोळे आपल्याला दिसले ! आणि त्याच वेळीं तो या कुशीवरून वळला. आपल्याला पडलें तें स्वप्नच—गुरुनाथ जिवंत आहे—अगदीं आपल्या-शेजारीं आहे या जाणिवेनें आपल्याला मनस्वी आनंद झाला आणि त्या आनंदाच्या भरांतच आपण गुरुनाथाच्या त्या हंसऱ्या डोळ्यांचें चुंबन घेतलें !'

पहांटेचें ते स्पप्न व स्वप्नानंतरचा तो प्रकार विनोदिनीच्या डोळ्यापुढून झरकन् निघून गेला ! त्यांतील पहिला भाग जितका दुःखद होता, तितकाच दुसरा भाग सुखद होता ! पण, तरीही तिला राहून राहून वाटत होतें कीं या स्वप्नाचा अर्थ काय ? पहांटे पड-लेली स्वप्नें खरी होतात असें तिनें लहानपणीं माईसाहेबांच्या तोंडून ऐकलें होतें. त्याची तिला आतां एकदम आठवण झाली आणि त्या आठवणीसरशीं तिचें आंग शहारलें !

पहांटे पडलेलें स्वप्न खरें व्हावयाचें म्हणजे गुरुनाथ आपल्याला कायमचा अंतरावयाचा !

या कल्पनेनें तर ती अधिकच भ्याली ! तिनें गुरुनाथचा हात ओढून त्याला आपल्या पलंगावर आपल्या शेजारीं बसविलें आणि त्याच्याकडे ती रोखून पाहूं लागली !

बराच वेळ ती शून्य दृष्टीनें त्याच्याकडे पहात होती !

तिच्या या वर्तनाचा गुरुनाथला कांहींच उमज पडेना ?

आणि त्यानें जेव्हां तिला अगदीं खोदून खोदून विचारलें तेव्हां मोठ्या कष्टानें तिनें आपल्याला पहांटे पडलेलें स्वप्न सांगितलें !

स्वप्नाची ती हकीकत ऐकून गुरुनाथही क्षणभर चपापला. दुसऱ्याचक्षणीं त्यानें आपल्या मनांतील भिती दूर केली !

'पहांटे पडलेलीं स्वप्नें खरी होतात, असें मी ऐकलें आहे, तें खरें कारे ?' या विनोदिनीच्या व्याकुळ स्वरानें विचारलेल्या प्रश्नाचें तिला काय उत्तर द्यावें हें गुरुनाथला सुचेना !

'बिनू' तिला जवळ घेऊन तो म्हणाला, "मलाही तुझ्यासारखेंच पहांटे एक स्वप्न पडलें. पण तें किती उत्तेजित करणारें होतें ! आपल्या दोघांचा विवाह झाला आहे—माझ्या गळ्यांत आपल्या थरथरणाऱ्या हातानें पुष्पमाला घालतांना लज्जेनें तुझा चेहेरा आरक्त झाला आहे ! लग्नानंतर एकच वर्षानें आपल्या प्रेमाचें गोड फळ आपल्याला पहावयास मिळालें आहे ! पहांटे पडलेलीं स्वप्नें खरी होतात असें मानलें तर मला पडलेलें स्वप्नच खरें ठरणार आहे."

गुरुनाथच्या या धिराच्या शब्दांनीं विनोदिनीची बावरलेली मनःस्थिति ताळ्यावर आली. इतक्यांत आंतील खोलींत कसलासा खडखटाड झाला म्हणून ती आंत गेली. एका मांजरानें उंदरावर झडप घालून त्याचा गतप्राण झालेला देह आपल्या तोंडांत धरला होता !

नकळत तिच्या मनानें गतप्राण झालेला तो उंदीर आणि गुरु-

नाथ यांची तुळना केली! 'मन चिंती तें वैरी न चिंती' या म्हणीचें प्रत्यंतर तिला त्यावेळीं आलें!

शेजारच्या बिऱ्हाडांत लावलेल्या ग्रामोफोनवील 'प्रेम म्हणजे दो जिवाची एकता' हे स्वर तिला पुन्हां ऐकूं आले. त्या गाण्यानें दुःखीकष्टी झालेली तिची चित्तवृत्ती बहरली.

आतां तें भयंकर स्वप्न ती पूर्णपणें विसरून गेली होती. अत्यंत उल्हासित वृत्तीनें तिनें स्टोव्ह पेटवून चहा केला व दोघानींही तो घेतला. चहा प्याल्यावर तिला आणखीं बरें वाटलें!

दहा वाजण्याच्या सुमारास गुरूनाथनें आंगांत कोट चढवून बाहेर जाण्याची तयारी केली. विनोदिनी आंतल्या खोलींत स्वयंपाकाच्या तयारीला लागली होती!

विनोदिनीची काढलेली प्रतिमा आपल्या हातांत घेऊन तिला बाहेर जातों असें सांगण्याकरतां गुरूनाथ आंतल्या खोलींत आला! त्याला दारापर्यंत पोंचता करण्याकरतां म्हणून विनोदिनी बाहेरच्या खोलींत आली!

इतक्यांत गुरूनाथला कसली आठवण झाली कोणास ठाऊक त्यानें झटदिशी आपल्या हातांतील विनोदिनीची प्रतिमा खालीं ठेवली व तिचा हात आपल्या हातांत घेतला! त्याच्या त्या चंचल वृत्तीचें विनोदिनीला जितकें हसूं आलें, तितकेंच आपल्यावरील त्यांचे उत्कट प्रेम पाहून तिला बरें वाटलें! कसली तरी रुखरुख त्याच्या मनाला लागून राहिली होती आणि त्यामुळें तो अस्वस्थ झाला होता!

अशा अस्वस्थ मनःस्थितींच विनोदिनीला त्यानें झटकन आपल्याजवळ घेऊन तिचें चुंबन घेतलें! त्याच्या या वर्तनाचा अर्थच तिला समजेना, आणि त्याचा त्यानें केलेला खुलासा ऐकून तर ती एकदम हादरली! 'विनू' तो कंपित आवाजांत म्हणाला

"मी जरा बाहेर जाऊन येतो ! या तुझ्या प्रतिमेला फ्रेम करावयाची आहे. त्या दुकानांत प्रत्यक्ष बसून माझ्या मनासारखी फ्रेम करून घेणार आहे म्हणून मला थोडा वेळ लागेल ! ही मुंबई आहे, आणि तुला माहित आहेच कीं, हजारो वाटांनीं येथील लोकांवर मृत्यु आपली झडप घालण्याकरितां टपलेला असतो. कुणाला ठाऊक कदाचित माझ्यावरही काळाची झडप पडेल आणि म्हणूनच—म्हणूनच ................" त्याच्यानें पुढें बोलवेना !

त्याच्या त्या बोलण्यानें विनोदिनीला आपल्या पायाखालची जमीन गरगर फिरत आहे असें वाटलें 'मग आतांच बाहेर जाण्याचें काय नडलें आहे !' असा तिनें प्रश्न विचारला व डोळे उघडून पाहिलें तो गुरुनाथ बाहेर गेलेला तिला आढळला.

पहांटेच्या त्या भयंकर स्वप्नाचा आणि गुरुनाथाच्या आतांच्या या उद्गाराचा तिला मेळ घालतां येईना !

पण भवितव्यता तो मेळ बरोबर घालणार होती हें विनोदिनीला त्यावेळीं कळलें असतें तर ?

× × × ×

दुपारीं एक वाजून गेला तरी गुरुनाथ न आलेला पाहून विनोदिनीच्या मनांत विचारांचा कल्लोळ उडाला. राहून राहून तिला वाटूं लागले कीं, आपलें पहांटेचें स्वप्न खरें ठरणार ! असें आपल्याला कां वाटत आहे हें तिचें तिला समजेना आणि कांहीं केल्या त्या स्वप्नाचें विचार तिच्या डोक्यांतून जाईनांत !

मनांतील विचारांना वाट करून देण्याकरितां तिनें आपल्या अत्यंत आवडीचें 'महाभारत' वाचावयास काढलें. त्यांतील अमुकच भाग वाचावयाचा असें न ठरवितांच तिनें तें पुस्तक उघडलें. पण कर्मधर्मसंयोग असा कीं, 'द्रोणाचार्यांनीं रचलेल्या चक्रव्यूहांत अड-

कलेल्या एकाकी अभिमन्यूचा त्या दुष्ट कौरवांनीं कसा वध केला हाच भाग नेमका तिनें उघडला !

अभिमन्यूच्या त्या वधानें अर्जूनासारख्या पुरुषानेंही कसा शोक केला याचें हृदयाला पाझर फोडणारें ते वर्णन तिला वाचवेना. तिनें खिन्न मनानें महाभारत बाजूला ठेवलें !

तिच्या डोळ्यापुढून अभिमन्यूवधाचा प्रसंग कांहीं केल्या हलेना! थोड्याच वेळानें त्या अभिमन्यूच्या जागीं तिला गुरुनाथाची मूर्ती दिसूं लागली !

'एकीकडून ट्राम--दुसरीकडून बसचें धूड, तिसरीकडून मोटारींची धांदल यांच्या चक्रव्यूहांत आपला गुरुनाथ सांपडला आहे—कोठूनही बाहेर पडावयास त्याला रस्ता सांपडेना ! तशाही स्थितींत त्यानें आपली फ्रेम केलेली प्रतिमा आपल्या हृदयाशीं घट्ट धरून ठेवली आहे !

आणि 'इतक्यांत—इतक्यांत एका प्रचंड बसचें धूड त्याच्या डोक्यावरून जाऊन त्याच्या चिंधड्या चिंधड्या झाल्या असा देखावा तिला दिसला' !

त्या भयंकर देखाव्यानें घाबरून जाऊन तिनें जोरानें किंकाळी फोडली !

आणि इकडे खरोखरच गुरुनाथ एका लष्करी मोटारीखालीं सांपडून तात्काळ गतप्राण झालेला होता ! त्याच्या डोक्यावरूनच मोटार गेल्यामुळें तें फुटून त्याचा मेंदू बाहेर पडला होता. विनोदिनीच्या प्रतिमेला त्यानें आपल्या हृदयाशीं घट्ट आवळून धरल्यामुळें त्या फोटोच्या काचेचे तुकडे त्याच्या शरिरांत ठिकठिकाणीं घुसले होते ! रक्ताच्या चिळकांड्या उडून विनोदिनीचा त्या फोटोंतील चेहेरा अगदी लालभडक झाला होता ! विनोदिनीला पहाटे पडलेलें तें भयंकर स्वप्न अशारितीनें खरें झालें होतें !

पोलिस पंचनामा व इतर कायदेशीर विधी होऊन गुरुनाथाचें

प्रेत दुपारीं चार वाजण्याच्या सुमारास त्याच्या खोलीवर आणण्यांत आलें! अनेक ठिकाणीं शोध करूनही विनोदिनीला गुरुनाथचा पत्ता न लागल्यामुळें हताश होऊन म्लान मनःस्थितींत ती आपल्या कॉटवर पडली होती! दरवाज्यावरील टकटक ऐकून तिला गुरुनाथच आलासें वाटलें! मोठ्या उल्हासित अंतःकरणानें ती उठून बाहेर आली आणि गुरुनाथचा तो छिन्नविच्छिन्न झालेला देह पाहून तिनें एक भयंकर किंकाळी फोडली व ती बेशुद्ध झाली!

अर्ध्या तासानें ती शुद्धीवर आली तेव्हां शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं गुरुनाथाचें शव अंत्यविधीकरतां नेलेलें तिला आढळून आलें! रडावें —भयंकर रडावें असें तिला वाटत होतें पण तिच्या डोळ्यांतील अश्रु दुःखाच्या कडक वाफांनीं केव्हांच आटून गेले होते!

तिच्या शेजारींच तिला आपली रक्तलांछित प्रतिमा पडलेली आढळून आली! त्या फ्रेमची कांच पन्नास ठिकाणीं भंगली होती! आपलें सुख त्या कांचेप्रमाणेंच सर्वस्वी दुभंगून गेलें आहे, असें तिला वाटलें! आपल्या त्या फोटोंत तिला गुरुनाथची मूर्ती दिसूं लागली! पण ज्या फोटोला फ्रेम करण्याच्या पायीं गुरुनाथ बाहेर गेला आणि म्हणूनच त्याला अपघात झाला—तो आपल्याला कायमचा सोडून गेला—तो फोटो आपल्या दृष्टीसमोर नको म्हणून तिनें रागानें त्याच्या चिंधड्या चिंधड्या उडविल्या! तशा त्या असहाय्य मनःस्थितींत ती किती वेळ तरी बसून होती, आणि त्यावेळीं गुरुनाथच्या सहवासांतील अनेक प्रसंग तिच्या दृष्टीपुढून एकामागून एक निघून गेले!



प्रभाकराचा आतां मुंबईत चांगलाच जम बसला होता! निर्मलेशीं लग्न केल्यापासून तो तिच्याशीं इतका समरस झाला होता कीं, माईसाहेब जगन्नाथ—विनोदिनी या सर्वांना तो विसरला होता!

दिवसभर आपलें काम करावें, सायंकाळीं निर्मलेला घेऊन चौपाटी किंवा मलबारहिलवर फिरावयास जावें, अशा मजेंत तो कालक्रमणा-करीत होता.

निर्मलेचा आणि त्याचा विवाह होऊन आतां चार महिन्यांच्या-वर कालावधी झाला होता. निर्मला आतां माता होणार म्हणून त्याला कमालीचा आनंद झाला होता. निर्मलेला होणारें मूल हें आपल्या रक्तामांसांचे नाहीं हें त्याला माहित होतें पण तसा दुजा-भाव त्यानें कधींही दर्शविला नव्हता !

निर्मलेच्या सुखांत एवढेंच एक दुःख होतें ! आपल्याला आतां मातृत्त्व प्राप्त होणार म्हणून तिला एकप्रकारचा अननुभूत असा आनंद होत होता; पण त्या अपत्त्याचें पितृत्त्व प्रभाकराकडे नाहीं ही गोष्ट तिच्या मनांत खुपत होती ! राहून राहून तिला वाटे, प्रभाकराचे पुरुषी मन कधीं फिरेल कीं काय ? तिच्या मनांत ही शंका अगदीं क्षणभरच टिके ! प्रभाकराचें तिच्याशीं आजपर्यंतचें वर्तन असें होतें कीं, अशी शंका आपल्या मनांत यावी याचा तिला फार राग येत असे ! आपल्या मनावरच ती चिडे !

त्या दोघांच्या हिशोबाप्रमाणें निर्मला प्रसूत व्हावयास अद्याप दीड-दोन महिन्यांचा अवधी होता ! पण माणसाची अपेक्षा दैवानें नेहेमींच खरी केली तर, मग त्या दैवाला विचारणार कोण ?

एके दिवशीं अचानकपणें निर्मलेचें पोट दुखूं लागलें ! प्रसूतीच्या वेदनांनीं ती आपल्या पलंगावर गडबडा लोळत होती ! प्रभाकरनें घाईघाईनें डॉक्टर देशपांडे यांना बोलावून आणलें ! निर्मलेला तसें गुरासारखें लोळतांना व आक्रंदतांना पाहून त्याच्या मनांत अत्यंत कालवाकालव झाली ! अपत्य जन्मापूर्वी स्त्रियांना केवढ्या भयंकर दिव्यांतून जावें लागतें याची त्याला त्यावेळीं कल्पना आली ! स्त्रीजातीबद्दल त्याच्या मनांत असलेला आदर आणखींच वाढला !

दोन दिवसांच्या तब्बल हालअपेष्टानंतर निर्मलेच्या दुःखाचा एकदांचा अंत झाला. ती अकालीं प्रसूत झाली आणि त्या दोघां-च्याही अपेक्षाप्रमाणें तिला मुलगी झाली. निर्मलेच्या आनंदाला पारावार नव्हता ! मातृत्व-प्राप्तीच्या आनंदाची खरी कल्पना फक्त स्त्रियानांच येऊं शकते !

निर्मलेइतकाच प्रभाकरालाही आनंद झाला होता ! निर्मला आणि तो देहानें भिन्न असले तरी मनानें एकच होते ? एकाला दुःख झालें तर दुसऱ्याच्या डोळ्यांत चटकन अश्रू यावेत इतके ते दोघे एक-मेकाशीं समरस झाले होते ! निर्मलेच्या पायगुणानेंच आपला धंद्यांत इतका जम बसला, या भावनेनें तिच्याबद्दल एक प्रकारची कृतज्ञता-बुद्धी त्याच्या मनांत बसत होती !

आपल्या दोघांच्या कलापूर्ण संसारांत त्या मुलीचा जन्म झाला होता आणि म्हणूनच कीं काय. कोणास ठाऊक, दोघांच्याही मनांत तिचें नांव कला ठेवावें असें आले आणि त्यानीं तें कृतींत उतरविलें !

प्रभाकर—निर्मला यांच्या आयुष्यांत आतां लहानग्या कलेनें प्रवेश केला होता !

तिच्याकडे पाहून निर्मला आपलीं दुःखें पार विसरून गेलीं !

— ९ —

गुरुनाथाच्या त्या अचानक व तितक्याच भयानक मृत्यूनें विनोदिनीच्या सर्व विचारशक्ती अगदीं सुन्न होऊन गेल्या होत्या ! जितक्या वेगानें गुरुनाथानें तिच्या आयुष्यांत प्रवेश केला होता तितक्याच किंबहुना त्यापेक्षांही जास्त वेगानें तो निघून गेला होता ! अगदीं दूर दूर गेला होता आणि तो आतां कल्पांतापर्यंतही परत येणार नव्हता !

गुरुनाथाच्या सहवासांतील एकेक आठवणी जागृत झाल्या

म्हणजे तर बिनोदिनीला विलक्षण दुःख होई आणि त्यांतूनच आतां पुढें काय, या विचारानें तर भितीही वाटे! परमेश्वरानें आपल्याला गुरुनाथाचा आधार दिला काय आणि एकाच आघातासरशीं तो हिरावून नेला काय? त्या सकाळीं गुरुनाथला अपघात झाला नसता तर त्या दुपारींच ती दोघे विवाहबद्ध होणार होती! सुखाचा कांठोकांठ भरलेला प्याला दैवानें आपल्या ओठाशीं आणला, पण कर्मानें तो आपल्या ओठाला पुरा लागण्यापूर्वीच बरच्यावर सफाईनें उडविला! मागल्या जन्मीं आपण असें कोणतें पाप केलें होतें, तें आतां या जन्मीं आपल्या डोळ्यांपुढें उभें ठाकलें?

अशा अनेक विचारांनीं तिच्या विचारशक्ती बधिर होत असत! पण आतां झालेल्याला कांहीं इलाज नव्हता—भूतकाळांतून वर्तमान-काळांत व वर्तमानकाळांतून भविष्यकाळांत झपाट्यानें कालक्रमण करीत असलेल्या स्वतःचें पुढें काय व्हावयाचें, याचा विचार तिला आतां करणें जरूर होते!

गुरुनाथाच्या मृत्युला आतां महिनाभर काळ लोटला होता. एके दिवशीं मंचित मुद्रेनें ती भविष्यकाळाचा विचार करीत बसली असतांना तिच्या मनांत एकदम एक शंका आली!

त्या शंकेसरशीं ती एकदम भयाकुल झाली! तिला सिनेमाहून आल्यानंतरच्या त्या रात्रीची आठवण झाली! त्याच रात्रीं मनानें एक झालेले ते दोन जीव शरिरानेंही एक झाले होते!

त्या दोन जीवांपैकीं एक जीव केव्हांच निघून गेला होता! आणि भूतलावरील दुःखें भोगण्याकरतां विनोदिनीचा जीव एकाकी राहिला होता!

दुसरेंच दिवशीं आपण गुरुनाथाशीं विवाहबद्ध होणार होतों म्हणून त्या रात्रीं आपल्या सर्वस्वाचें आपण त्याला दान केलें होतें!

आणि दुसऱ्याच दिवशीं तें दान घेऊन गुरुनाथ चालता झाला

होता ! तें दान आतां जगाच्या दृष्टीनें पाप ठरणार कीं काय, हीच तिला आलेली शंका होती !

तिच्या डोळ्यापुढें एकदम मालतीचा तो दीन चेहरा दिसूं लागला ! दुसऱ्याच क्षणीं मालतीची जागा गौरीनें घेतली होती ! आणि लगेच तिला त्या दोघींच्या जागीं स्वतःचा चेहेरा दिसूं लागला !

'मालती आणि गौरीच्या वाट्याला जी दुर्दशा आली होती ती तर आपल्या वाट्याला येणार नाहीं ?'

या विचारानें ती स्वतःशीच दचकली !

मालती—गौरीसारखी आपली स्थिति होणार नाहीं—कांहींतरी उपायानें तसें संकट आपल्यावर आलेंच तर तें टळेल अशी तिला आशा वाटत होती !

पण हा उपाय कोणता हें मात्र विचार करकरूनही तिला स्वतःला सांगतां येईना !

आणि त्या दिवशीं सकाळीं जो प्रकार घडला त्यामुळें तर तिची खात्रीच पटली कीं, ज्या कर्माला आपण भीत होतो तेंच आपल्या-पुढें विकट हास्य करून उभें आहे !

सकाळीं उठून ती तोंड धूत होती आणि तोंड धुतां धुतांच तिला एकदम भडभडून उलटी झाली !

प्रथम तिला वाटलें 'टुथपेस्ट घशांत गेली म्हणून आपल्याला उलटी झाली असेल' !

पण मनुष्याला ज्या गोष्टी नको असतात त्याच नेमक्या होतात, हें तिला अनेक प्रसंगांनीं पटलें होतें !

आपल्या गांवांतील श्रीमंतांना हरउपाय करूनही मुलें होत नव्हती, कारण त्यांना ती हवीहवीशीं वाटत होतीं !

आणि महारवाड्यांतील सगळ्या महारांच्या घरीं न चुकतां दर-वर्षी पाळणा हलत असे !

जसजसे दिवस जाऊं लागले, तसतसे तिला आपल्याला आतां खासच मातृत्व प्राप्त होणार असें वाटलें !

तें वाटणें किती भयंकर होतें ?

आज गुरुनाथ जिवंत असतांना ती जर माता झाली असती, तर तिच्या त्या भावी अपत्याचें कोण कोडकौतुक झालें असतें ! पण आज ? आज तिचें तें मातृत्व जगाच्या दृष्टीनें पाप होतें !

मालती आणि गौरीला त्यांच्या प्रियकरांनीं फसविलें होतें आणि गुरुनाथाला मृत्यूनें ओढून नेलें होतें !

जगाच्या दृष्टीनें त्या तीघींचीं परिस्थिति एकच होती ! क्षणिक मोहाचा—वासनातृप्तीचा तो भयंकर परिपाक पाहून तिला आपल्या-लाही मृत्यू येईल तर बरें असें वाटलें !

गुरुनाथाच्या मृत्यूपासून तिच्या डोळ्यांत शोक करावयाला अश्रूच शिल्लक राहिलेले नव्हते !

मुंबईसारखें अफाट शहर—पैशांची मदत नाहीं—कोणाची ओळख नाहीं, या स्थितींत आपलें पुढें काय होणार याची तिला एक-सारखी चिंता वाटत होती !

आणि अशा स्थितींत तिला एके दिवशीं एकदम जगन्नाथची आठवण झाली !

जगन्नाथ ! पण त्याच्याकडून आपल्याला कसलीच मदत होणार नाहीं असें तिला त्याचक्षणीं वाटलें !

' पाप हें केव्हांही पापच ! त्याला क्षमा नाहीं आणि कुमारी माता होण्याचें पाप करणाऱ्यांना मृत्यू हेंच प्रायःश्चित योग्य आहे. ' हें जगन्नाथाचे उद्गार तिला एकदम आठवले. या त्याच्या माणुस-

कीशून्य विचारसरणीचा तशा त्या अनुकंपनीय स्थितीतही तिला तिटकारा वाटल्यावाचून राहिला नाहीं !

तिनें जगन्नाथाविषयीचें विचार आपल्या मनांत काढून टाकले, आणि तिला प्रभाकरची एकदम आठवण झाली !

प्रभाकर !

पण त्याला शोधावयाचें कोठें ?

तिच्यावरचें संकट दिवसा दिवसानें जवळ येत चाललें होतें !

दिवसा तिचा कसा तरी वेळ जात असें,पण रात्रीं हजारों विचारांनीं तिचें डोकें फिरून जाण्याची वेळ येई !

उद्यां आपल्याला मूल झालें तर त्याचें संगोपन कसें करावयाचें हाच प्रश्न प्रामुख्यानें तिला भेडसावित होता !

मोठ्या प्रयासानें तिला एक चांगल्या कुटुंबांतील मुलींना शिकविण्याची शिकवणी मिळाली होती !

पण दैव जिथें तिथें तिच्या पाठीमागें हात धुवून लागलें होतें !

एके दिवशीं तिच्या विद्यार्थिनींच्या आईनें तिला आपल्या खोलींत बोलावून घेतलें व उद्यांपासून शिकवणीची जरूरी नाहीं असें सांगून तिचा महिन्याचा पगार चुकता केला !

त्या बाईचे तें मर्मभेदक उद्गार तिच्या कानांत राहून राहून घुमसत होते !

तिनें आपली केलेली हेटाळणी, चेहेऱ्यावर व्यक्त केलेली तिरस्काराची भावना यानीं तिला फारच दुःख झालें !

'पुरुषापेक्षां स्त्री हीच स्त्रीची जास्त शत्रु आहे' हे एका प्रख्यात लेखिकेचे उद्गार तिला त्या बाईनें अशा रितीनें पटवून दिले होते !

त्याबाईचा निरोप घेऊन ती अत्यंत व्यथित अंतःकरणानें बाहेर

पडली ! आतून आपल्यां हेटाळणी दर्शक उद्गार व त्या पाठीमागूनचें कुत्सित हास्य हें तिच्या कानावर पडलें !

ती भरभर पावलें टाकून आपल्या बिऱ्हाडी आली !

त्यावेळीं रात्रीचे आठ वाजले होतें !

भावी संकटांच्या विचारानें तिची अन्नावरची वासना उडाली होती ! दिवा मालवून तिनें कॉटवर आंग टाकलें !

शेजारच्या बिऱ्हाडांतून ' प्रेम म्हणजे दो जिवाची एकता ' हें काव्यचरण तिला ऐकूं आलें !

ती एकदम क्षुब्ध मनःस्थितींत कॉटवरून उठली व भराभर तिनें सर्व खिडक्या लावून घेतल्या !

— १० —

विनोदिनीच्या गृहत्यागापासून जगन्नाथची मोठी चमत्कारिक स्थिती झाली होती. गेल्यापासून तिच्याकडून एक बोटभरही चिठ्ठी त्याला आली नव्हती. आपल्यावर विनोदिनीचें गाढ प्रेम होतें पण तरीसुद्धां ती आपल्या केवळ विचारसरणीला भिऊन आपल्याशीं ठर-लेला विवाह मोडून निघून गेली, याचें त्याला राहून राहून आश्चर्य वाटत होतें.

विनोदिनीच्या गृहत्यागानें माईसाहेबांच्या मनावर दुसरा आघात झाला होता ! प्रभाकर निघून गेला आणि त्याच्यामागे विनोदिनी गेली. दोघांच्याही जाण्याला कारणीभूत झाला होता जगन्नाथच, आणि इतकें असूनही जगन्नाथची कांहीं चूक आहे असें त्यांना वाटेना !

आणि एके दिवशीं त्यांना आलेल्या विनोदिनीच्या पत्रानें तर त्यांचीं तिच्याविषयींची आठवण अधिकच जागृत झाली.

‘ ति. श्रीमती माईसाहेब यांस,— शि. सा. न., वि. बि. ’

विनोदिनीनें लिहिलें होतें.

‘ आपलें घर सोडल्यापासून माझें हें पहिलेंच पत्र आलें, याबद्दल आपणांस आश्चर्य वाटेल. माझ्या आणि जगन्नाथच्या विचारसरणींत इतकें अंतर होतें कीं, त्यावेळीं मी ठरलेलें लग्न मोडून घराबाहेर पडलें नसतें, तर त्याचा परिणाम चांगला झाला नसता. आज मी अशा आपत्तींत सांपडलें आहे कीं, आपणच फक्त मला मदत करूं शकाल. मी सर्व स्पष्टपणें लिहिणार आहे.

मुंबईला आल्यावर माझी गुरुनाथ नांवाच्या एका तरुणाशीं ओळख झाली — ओळखीचें रुपांतर परिचयांत झालें—आणि परिचयाचें प्रेमांत झालें. आमचें दुसरें दिवशीं लग्न होणार होतें आणि त्याच्या आदल्याच रात्रीं आम्ही मनाप्रमाणें शरिरानेंही एकजीव झालों होतों. पण दुर्दैवानें दुसऱ्याच दिवशीं गुरुनाथांना भयंकर अपघात होऊन ते मृत्यु पावले, पण मरणापूर्वी ते आपली आठवण ठेऊन गेलेंत आणि ती माझ्या पोटांत दिवसेंदिवस वाढत आहे. मी लौकरच माता होणार आहे !

आपण एक स्त्री आहांत ! स्त्री हृदयाचीं दुःखें आपणच जाणूं शकता आणि म्हणूनच मी आपणांस हें पत्र लिहिलें आहे. आपल्या पुढें मी मदतीकरतां हात केला आहे. आपण तो झिडकारणार नाहीं ना ? ”

विनोदिनीच्या या पत्रानें माईसाहेबांना कमालीचें वाईट वाटलें. ती त्यांची मुलगी नव्हती, पण तिला त्यांनीं पोटच्या मुलीइतकेच— किंबहुना त्यापेक्षांही जास्त प्रेमानें वाढविलें होतें.

तिचें तें हंसरें तेजस्वी डोळे त्यांच्या दृष्टीपुढें आले ! आपल्या मुलीइतकीच आपल्याला प्रिय असलेल्या विनोदिनीवर हा प्रसंग

ओढवला ही कल्पनाच त्यांना सहन होईना. त्या जुन्या मताच्या होत्या. पण नवीन परिस्थितीमुळें कधीं-कधीं काय अनर्थ होऊं शकतात याची त्यांना थोडीफार जाणीव होती.

आणि जगन्नाथनें जेव्हां ते विनोदिनीचें पत्र वाचलें तेव्हां त्याला तें किती तरी वेळ खरेंच वाटेना. आदल्याच रात्रीं 'माझं बाळ' हा बोलपट तो पाहून आला होता. त्यांतील शशी त्याला आठवली आणि विचाराच्या भरांत शशीची जागा विनोदिनीनें आणि मनोहरची जागा आपण घेतली आहे असें त्याला वाटलें!

'माझं बाळ' मधील शशीला मनोहरचा आश्रय मिळाला होता. तिला एक मूल आहे असें कळल्यावर तो आश्रय तुटण्याचीही वेळ आली होती, पण शेवटीं मनोहरांना पश्चाताप झाला होता!

आणि आपण?

आपण चूक कीं बरोबर?

आपल्याच चुकीमुळें विनोदिनीवर ही अनर्थपरंपरा ओढवली!

गौरी—मालती आणि विनोदिनी!

तिघी एकाच मोहाला—अगदीं क्षणिक मोहाला बळी पडून भयंकर संकटांत सांपडल्या होत्या!

गौरी आणि मालती यांना पापमुक्त होण्याकरतां मृत्युचा मार्ग स्वीकारावा लागला; त्यावेळीं आपल्याला कांहींच वाटलें नाहीं पण आज—आजचा प्रसंग विनोदिनीवरचा आहे. आपण जिच्यावर एकेकाळीं जिवाभावानें प्रेम केलें, तिच्यावर आहे या जाणिवेनें त्याला फार वाईट वाटलें!

त्याला वाटलें एकदम विमानाच्या वेगानें जावें आणि आपल्या लाडक्या विनोदिनीला जवळ घेऊन तिला सांगावें.

'विनू, घाबरूं नकोस. मी आहे तुझ्याजवळ तुला मदत करावयाला' !

हा त्याचा विचार क्षणभरच टिकला !

जें पाप विनोदिनीच्या हातून झालें आहे तेंच मालतीनें केलें होतें, पण तिला आपण मदत करण्याचें नाकारले !

आणि आज आपलीं मतें बाजूस टाकून आपण विनोदिनीच्या सहाय्याला जाण्याचा विचार करीत आहोंत !

त्याला वाटलें विनोदिनींत आणि आपल्यांत इतके दिवस फक्त कांहीं मैलांचेच अंतर होतें, पण आतां तें अंतर इतकें वाढलें आहे कीं ते कधींही कमी होणार नाहीं !

या शेवटच्या विचारानें तर तो अधिकच खिन्न झाला !

त्याला वाटलें कुमारी मातांचा हा वाढता प्रश्न सुटणार आहे तरी कसा ? दिवसेंदिवस विनोदिनीसारख्या स्त्रियांची संख्या वाढतच आहे ? आणि याबर उपाय ?

आपल्यासारख्या तरूणांनींच या प्रश्नाला धैर्यानें तोंड द्यावयास नको काय ?

विचारानें सुन्न झालेल्या डोक्याला विश्रांती मिळावी म्हणून तो बागेंत आला. नुकताच पाऊस पडून गेल्यामुळें झाडांना एक प्रकारची टवटवी आली होती. बागेंतल्या एका बाकावर तो बसला !

विनोदिनीविषयींचे विचार त्याच्या डोक्यांतून कांहीं केल्या जाईनांत ! त्यानें आपली अश्रुपूर्णदृष्टी हतबुद्ध होऊन निरावधानपणानें कुठें तरी लावली होती. विचारांच्या भारानें त्याचें मस्तक अधिक अधिकच सुन्न होऊं लागले !

बागेंतून उठून तो घरांत आपल्या खोलींत आला व असहाय्य अशा मनःस्थितींतच त्यानें कॉटवर आंग टाकले !

वैचारिक ग्लानीमुळें त्याला झोप लागली, तरी स्वप्नांतसुद्धां त्याला सारखी बिनोदिनी दिसत होती !

तिचे ते खोल पण हंसरे डोळे आपल्याकडे पाहून आपल्या मदतीची अपेक्षा करीत आहेत, असें त्याला दिसलें !

थोड्या वेळानें पुन्हां त्याला 'माझंबाळ' मधील शशी-मनोहर यांच्या मीलनाचा गोड प्रसंग दिसला !

त्या बागेंतील तो महात्मा गांधींचा हंसरा पुतळा आपल्याला 'चुकलेल्यांना क्षमा कर—पापाकडे तिरस्कारानें न पहाता क्षमाशील दृष्टीनें पाहून जगांतील पाप कमी कर' असेंच बजावित असल्याचा भास झाला !

'मनोहरचें मतपरिवर्तन झालें—त्यानें शशीला आपली म्हटली, तसें आपण करूं शकूं काय?' असें त्याचें मन त्याला जाग आल्यावर विचारूं लागलें !

× × × ×

पंधरा दिवस विचार करकरूनही आपण काय करावें हें जगन्नाथला सुचेना ! मध्येंच त्याचें एक मन उसळी मारून उठे व ताडकन मुंबईला जाऊन बिनोदिनीला जवळ घ्यावें—तिच्या केसावरून हात फिरवावा—तिला धीराचे चार शब्द सांगावेत असें त्याला बजावी !

इतर कोणत्याही वेळेपेक्षां आज बिनोदिनीस आपल्या मदतीची फार जरूर आहे नाहींतर एखादे दिवशीं तिची मालतीसारखी स्थिति व्हावयाची असें त्याला एकसारखें वाटत होतें !

मनाची ही द्विधा स्थिति लपविण्याकरितां तो तासनतास आपल्या खोलींत विचार करीत बसत असे !

बिनोदिनीनें आवडीनें खरेदी करून आपल्याला आपल्या एका वाढदिवशीं बक्षिस दिलेल्या एका तरुण स्त्रीच्या संगमरवरी पुतळ्याची त्याला आठवण झाली !

दिवाणखान्यांत जाऊन त्यानें तो पुतळा आपल्या खोलींत आणला व त्याच्याकडे तो टक लाऊन पाहूं लागला !

पूर्वीं कधींही वाटलें नव्हतें इतकें त्याला आज त्या पुतळ्याचें आकर्षण वाटूं लागलें !

त्यानें त्या पुतळ्याला स्पर्श केला ! तो स्पर्श त्याला अतिशय थंड वाटला ! त्याला वाटलें त्या पुतळ्यांतील स्त्रीचे डोळे आपल्याशीं कांहींतरी बोलत आहेत !

पण, तो केवळ भास होता !

अभावितपणेंच त्यानें त्या पुतळ्यावरून आपला हात फिरवावयास सुरुवात केली !

त्या पुतळ्यांतील स्त्रीच्या उन्नत वक्ष:स्थळावरून त्याचा हात गेल्यावर आपल्या शरिरांतून एक गोड गोड चमक गेल्याचें त्याला वाटलें ! आपण काय करीत आहोंत हें कळण्यापूर्वींच त्यानें त्या पुतळ्याला आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें व त्या दगडी—निर्जिव स्त्रीच्या ओंठावर आपले ओंठ टेकवून त्याचें दीर्घकालपर्यंत चुंबन घेतलें !

क्षणभरानें तो जेव्हां भानावर आला तेव्हां आपल्या डोळ्यांतून टिपकलेले दोन अश्रूबिंदू त्या पुतळ्यावर त्याला दिसले !

त्याला वाटलें एका निर्जिव—दगडी पुतळ्याचा आपल्याला इतका मोह पडला, मग विनोदिनीला दोष देण्यास आपल्याला काय अधिकार आहे ?

'आपल्यासारख्याच तिला भावना आहेत—तारुण्यसुलभ उर्मींतून, बंड करून उठणारा मोह आहे आणि त्याला ती बळी पडली असली तर त्यांत नवल काय ?'

दुसरेंच दिवशीं मुंबईला जाऊन विनोदिनीला आपल्या घरीं घेऊन यावयाचें असा त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला !

त्याच्या या विचारांशीं माईसाहेबही सहमत होत्या !

## — ११ —

पुढें काय हा विचार दिवसेंदिवस विनोदिनीला भेडसाविति होता. अधिक अधिक अस्वस्थ करीत होता !

कसली तरी नोकरी करून चरितार्थ चालविण्याचीं तिच्या अंगांत पात्रता नव्हती, आपल्याला आयुष्यांत त्याची कधीं जरूरी पडेल असें तिला वाटलेंहि नव्हतें ! या विचाराच्या वैतागानें ती रोज रात्रीं परमेश्वराला आपल्याला मरण देण्याची विनंती करी ! पण मृत्यु इतका दयाळू थोडाच होता ?

ज्याला तो हवाहवासा वाटतो त्याच्यापासून तो नेहमीं चार पावलें दूर असतो आणि नको असेल त्याला ?

त्याच्यावर तो आपली काळझडप घालावयास कमीं करीत नाहीं !

थोड्याच दिवसांत आपण व गुरुनाथानें जगाच्या दृष्टीनें केलेल्या पापाचें फळ आपल्या कुशींत येणार अशीं स्पष्ट चिन्हें तिला दिसूं लागलीं !

इतके दिवस तिला फक्त मानसिक दुःखच होत असें पण आतां त्याच्या जोडीला शारीरिक दुःखही आलें होतें !

पंधरा दिवस वाट पाहूनही तिला माईसाहेबांकडून तिच्या पत्राचें उत्तर आलें नव्हतें त्यामुळें तिच्या आशेचा तो एक आधार तुटला होता !

तिला वाटलें, आतां या सबंध पृथ्वीतलावर आपल्याला मदत करणारा कोणी असेल तर एकटा प्रभाकरच !

पण त्याची भेट कशी व्हावयाची हें तिला सुचत नव्हतें !

नुसत्या फिरण्याचा कांहीं एक उपयोग नव्हता !

आणि तसें फिरावयाचें म्हटलें तरी तिच्या अंगांत तेवढें कुठें त्राण होतें ? विचार करकरून तिचें मन भारावलेलें होतें—आणि शरीर—तें मातृत्त्वानें भारावलें होतें !

शेजारच्या बिऱ्हाडांतून आपल्याविषयीं चाललेली कुजबूज तिला ऐकूं येत होती ! तिच्याविषयीं अनेकांनीं अनेक तर्क केले होते !

कांहीं बायकांनीं तिला अनाथाश्रमांत जाण्याचा सल्ला दिला होता !

कांहींनीं स्त्रीजातीला न शोभेल असा कांहीं अघोर उपायही सुचविला होता !

पण त्याच्या पलीकडे प्रत्यक्ष मदतीची कृती करण्याची कोणाला इच्छा होत नव्हती. उलट तिला ऐकूं जाईल अशा रितीनें मर्मभेदक उद्गार काढण्यांत त्यांतल्या अनेक स्त्रियांना आनंदच वाटे !

शेवटीं शेजारच्या बिऱ्हाडांतील एका वृद्धगृहस्थाला तिची दया आली !

त्या वृद्ध-गृहस्थांनीं—काकासाहेब दाबक्यांनीं तिची ती अनुकंपनीय स्थिति जाणली. वयानें ते सनातनी होते, तरी विचारानें बरेंचसे सुधारकहि होते !

आपल्या ओळखीनें त्यांनीं मालतीबाई शृंगारपुरे नांवाच्या एका श्रीमान स्त्रीकडे बिनोदिनीची सोय करून दिली !

बिनोदिनीनें त्यांच्याजवळ कंपॅनियन् म्हणून रहावयाचें; दिव-सांतून तास दोन पुस्तकें वृत्तपत्रें वगैरे वाचून दाखवावयाचीं अशीं तिची नोकरी होती.

या नोकरींत बिनोदिनीला फारसें सुख वाटत नव्हतें. वास्त-विक मालतीबाईकडे तिला कसलाच त्रास नव्हता. तथापिही विचा-

रांच्या उर्मीनी सतावल्यामुळें तिला कांहींच सुचत नव्हतें. आणि यामुळें तिच्या हातून काम करतांना अनेक चुका होत ! ‘ आपलें पुढें काय ?’ या एकाच विचारानें तिचें सर्व मनःस्वास्थ्य हिरावून नेले होतें !

आणि त्या दिवशींच्या त्या प्रसंगानें तर या सर्वांवर कळसच झाला !

एका प्रख्यात लेखकाचें एक पुस्तक विनोदिनी मालतीबाईंना वाचून दाखवित होती !

कांहीं पानें वाचल्यावर तिला अगदीं नको असलेला कुमारी मातांबद्दल केलेल्या चर्चेचा एक भाग तिच्या वाचनांत आला. ‘ कुमारिकेचें मातृत्त्व हें जगांतील महाभयंकर पाप आहे. त्या पापाला कायद्यानें जबरदस्त शिक्षा ठोठावली पाहिजे, तरच त्याला कांहीं तरी आळा बसेल. एरवीं ही सांथ एखाद्या रोगाप्रमाणें फैलावल्याशिवाय रहाणार नाहीं ’ अशी विचारसरणी लेखकानें मोठ्या आवेशानें मांडली होती !

या लेखकाच्या त्या विचारसरणीवरून विनोदिनीला एकदम फार दिवसांनीं जगन्नाथची आठवण झाली !

हें पुस्तक जगन्नाथनें तर लिहिलें नाहींना असा तिला क्षणभर भास झाला.

मालतीबाईंच्या प्रेमळ सहवासांत ती आपलें दुःख हलके हलके विसरूं लागली होती, तोंच त्यावरची खपली पुन्हा त्या पुस्तकांतील विचारांनीं अशा रितीनें काढली. तिच्या दुःखाची जखम पुन्हा ताजी झाली. आपणाला भडभडून रडूं येणार असें तिला वाटूं लागलें.

हातांतील पुस्तक असहाय्यपणें खालीं टाकून ती उठली व मालतीबाईंशीं कांहीं एक न बोलतां आपल्या खोलींत निघून गेली. मालतीबाईंना तिच्या या कृतीचें आश्चर्य वाटलें ! या मुलीला कसलें तरी

दुःख आहे, हें मालतीबाईना माहित होतें. पण त्याची नक्की रूपरेषा त्यांना माहित नव्हती! विनोदिनी गरोदर आहे हें त्यांना कोणी सांगावयास नको होतें. पण काकासाहेबानीं त्यांना तिच्या कुमारी मातृत्वाची कल्पना दिली नव्हती. ती एक नवऱ्यानें टाकलेली बाई आहे एवढेंच त्यांच्याकडून कळलें होतें, आणि मालतीबाईनीही त्याबद्दल कधीं फारशी जिज्ञासूबुद्धीनें चौकशी केली नव्हती!

पण आजच्या त्या प्रकारानें विनोदिनीच्या दुःखाचें कारण कांहीं-तरी फार मोठें असलें पाहिजे असें त्यांना वाटलें. विनोदिनी वाचीत असलेलें पुस्तक त्यांनीं हातांत घेतले व तेंच पान नेमकें उघडून तिनें वाचलेला भाग वाचला! त्यांच्या तीव्र बुद्धिनें खरा प्रकार काय आहे तो तेव्हांच जाणला!

'एकूण विनोदिनी कुमारी माता आहे तर'! असे उद्गार त्यांच्या तोंडांतून अभावितपणानें बाहेर पडले.! तथापि, त्या दचकल्या नाहींत–किंवा तिच्याबद्दल त्यांना तिरस्कारही वाटला नाहीं!

त्या हलक्या पावलानें विनोदिनीच्या खोलीकडे गेल्या. खोलीचें दार उघडेंच होतें! आपल्या कॉटवर एका उशींत तोंड खुपसून ती रडत होती! आपल्या शोकांत ती इतकी चूर झाली होती कीं, मालतीबाई खोलींत आल्याचेंसुद्धां तिला, त्यांनीं तिच्या पाठीवर हात ठेवेपर्यंत कळलें नाहीं! मालतीबाईनी तिच्या पाठीवरून अत्यंत प्रेमळपणानें हात फिरविला! त्यांच्या त्या हाताच्या स्पर्शांत मातेचें वात्सल्य व पित्याचें प्रेम या दोन्हींचें मिश्रण झालेलें तिला आढळलें आणि त्यांच्या या सहानुभूतीच्या वागणुकीनें तिला जास्तच रडूं आलें! तिला मालतीबाई म्हणजे–देवताच आहेत असें वाटलें. त्यांच्या कटिभागाला तिनें मिठी मारली व अत्यंत असहाय्य अशा दृष्टीनें त्यांच्याकडे तीं पाहूं लागली.

थोडा वेळ असाच अगदीं निःशब्द स्थितींत गेला! तिचा दुःख-

भार हलका झाल्यावर मालतीबाईनीं तिची हकीकत तिला विचारून घेतली व तिनेंही त्यांत कोणताही आडपडदा न ठेवतां सर्व अगदीं निःशंक मनानें सांगून टाकलें !

मालतीबाई आणि जगन्नाथ ? विनोदिनीचें मन तशाही स्थितींत दोघांची तुलना करूं लागलें !

एक स्त्री—वयानें जगन्नाथापेक्षां कितीतरी मोठी—पण विचारानें तितकीच पुरोगामी !

आणि जगन्नाथ—वयानें तरुण पण विचारानें अगदीं सनातनी—पक्का प्रतिगामी वृत्तीचा !

आपल्या या तुलनेच्या विचारतंद्रींतून विनोदिनी आणखी किती वेळ भानावर आली नसती कोणास ठाऊक ? पण मालतीबाईनीं तिला म्हटलें, “ विनोदिनीबाई तुमची ही हकीकत ऐकूनही मी तुमचा तिरस्कार कसा करूं लागलें नाहीं याचें तुम्हांला आश्चर्य वाटत असेल. पण त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. मी एक स्त्री आहे आणि जगांत स्त्रियांवर कोणते प्रसंग ओढवतात, याची मला पूर्ण कल्पना आहे. त्यांतून तुम्ही तर पूर्ण निष्पाप आहांत अशी माझी खात्री पटली आहे, आणि तुमचें मातृत्व हें जरी पाप असतें तरीसुद्धां मी तुमच्याकडे तितक्याच सहानभूतीनें पाहिलें असतें. तिरस्कारानें पाप कधींही कमी होणार नाहीं. उलट तें वाढेल. क्षमाशील दृष्टीनें पाहूनच पाप्यांचा उद्धार होऊं शकेल. तसें नसतें तर, चोरीचें पाप केल्याबद्दल शिक्षा झालेले व तुरुंगांत जाऊन आलेले सर्वच लोक पुण्यात्मे बनले असते. पण अनुभव मात्र याच्या उलट आहे ! आणि मला ही शिकवण कुणी दिली तुम्हांला माहिती आहे ? या दाखवितें ! असें म्हणून मालतीबाईनीं विनोदिनीचा हात आपल्या हातांत घेतला व तिला त्या आपल्या शयनगृहांत घेऊन गेल्या. त्या शयनगृहांत सर्वत्र देशभक्तांचे फोटोच फोटो लावलेले होते.

मध्यभागीं एके ठिकाणीं एका बाजूला लोकमान्य टिळक व महात्मा गांधीं यांचीं भव्य तैलचित्रें लावलीं होतीं.

' पापाकडे क्षमाशीलवृत्तीनें पहा ' ही शिकवण मला या महात्मानें दिली असें म्हणून मोठ्या भक्तीभावानें मालतीबाईनीं गांधीजींच्या तैलचित्राला अभिवानदन केलें !

बिनोदिनींचे हातही न कळत जोडले गेले !

मालतीबाईनीं तिला दुसरी आणखी कांहीं चित्रें दाखविलीं !

न्याय्य हक्का करतां झगडण्यासाठीं आमरण उपोषण करून आपलें गाऱ्हाणें देवाघरीं सांगण्यासाठीं निघून गेलेल्या जतिंद्रदासाचा फोटो आपल्याला जणूं ' न्यायाकरतां झगड अन्यायापुढें मान वाकवूं नकोस ' असेंच बजावित असल्याचा तिला भास झाला !

' मी सत्य बोलतों तें परमेश्वराला भिऊन नव्हे तर सत्य बोलणें हें प्रत्येकाचें पवित्र कर्तव्य आहे म्हणून.' हे वीर भगतसिंगाच्या फोटोखालीं लिहून ठेवलेले त्या तेजस्वी देशभक्ताचें वचन वाचून तिलाही वाटलें, ' आपण सत्याकरतांच जगलें पाहिजे.' त्या शयनगृहांतील सर्व फोटो पाहून झाल्यावर ती पुन्हां महात्माजींच्या तैलचित्राशीं आली ! त्या महात्म्यापुढें आपलें मस्तक विनम्र करून तिनें अनन्यभावानें प्रार्थना केली आणि त्या तैलचित्राच्या खालीं एका कोपऱ्यांत अगदीं लहान अक्षरांत लिहिलेलें, ' प्रभाकर इनामदार ' हें चित्रकाराचें नांव वाचून आपल्याला हर्षवायुच होतोय कीं काय असें तिला वाटलें !

प्रभाकरचा तिला अशा अकल्पितरितीनें पत्ता लागला होता. आणि त्याबद्दल आज बऱ्याच दिवसांनीं कधीं नव्हता इतका आनंद तिला झाला !

मध्यंतरीं मालतीबाईना कोणीतरी भेटावयास आल्यामुळें त्या दिवाणखान्यांत गेल्या होत्या. बिनोदिनी उठली व एखाद्या लहान मुलां-

सारखीं जवळ जवळ धांवतच ती दिवाणखान्यांत आली. विनोदिनीचा तो हर्षोत्फुल्ल चेहेरा पाहून मालतीबाईंनाहीं थोडेसें आश्चर्यच वाटलें! आणि त्यांनीं कांहींतरी प्रश्न विचारण्याच्या आगोदरच विनोदिनी त्यांना म्हणाली, " बाई तें महात्माजींचें तैलचित्र तयार करणारे प्रभाकर इनामदार कुठें रहातात तुम्हांस माहित आहे ! "

तिच्या प्रश्नांतील अधिरता मालतीबाईच्या लक्षांत आली !

प्रभाकराचा हिचा संबंध काय असेंही त्यांना क्षणभर वाटलें. पण त्यांनीं अधिक वेळ न घालवितांच तिला प्रभाकरचा पत्ता सांगितला! स्वर्ग हातीं आल्याइतकाच विनोदिनीला आनंद झाला !

## — १२ —

प्रभाकर आणि निर्मला यांचा संसार अतिशय सुखाचा चालला होता. भरपूर पैसा हाताशीं असल्यामुळें त्यांना कोणत्याही गोष्टीचा तुटवडा म्हणून नव्हता ! तथापि, निर्मलेला मात्र आपल्या सुखाच्या संसारांत कांहींतरी खुपत असल्यासारखें वाटे. तें खुपणें अमुकच आहे असें तिलाही निश्चितपणें सांगतां आलें नसतें ! कांहीं दुःखांच्या तऱ्हाच अशा कांहीं विशिष्ठ रोगांसारख्या असतात कीं वरून दिसावयास मनुष्य तगडाजवान, पण हृदय मात्र क्षणाक्षणाला पोखरलें जात असतें. निर्मलेच्या दुःखाची हीच तऱ्हा होता ! वास्तविक तिला आतां काय कमी होतें ? प्रभाकरसारखा सुस्वभावी—दिलदार उमदा पती तिला मिळाला होता ! त्या दोघांच्या संसारांत त्यांचा आनंद द्विगुणित करण्याकरतां छोट्या कलेचा प्रवेश होऊन आतां तीन महिन्यांच्यावर काळ लोटला होता !

प्रभाकराच्या प्रेमळ सहवासांत निर्मलेला कसलीही आठवण होत नसे—पण कामानिमित्त तो बाहेर गेल्यावर कलेला घेऊन खेळवित बसल्यावर तिच्या मनांत विचारांचें काहूर माजे ! कलेकडे पाहिल्या-

वर तिचें पितृत्त्व प्रभाकरकडे असतें तर असा विचार निर्मलेच्या मनांत हजारदां येई ! कधीं कधीं तिला केशवचीही आठवण येत असे !

कलेचे डोळेच फक्त केशवच्या डोळ्यासारखे होते, बाकी ती सर्वस्वी आपल्या आईच्या वळणावर गेली होती ! ज्या केशवनें आपला केसानें गळा कापला त्याची ती तेवढीच खूण कलेच्या ठिकाणीं परमेश्वरानें ठेवली म्हणून त्याचाही तिला राग येत असे ! निर्मलेच्या मनांत खोल दडून बसलेलें तें दु:ख प्रभाकरला माहित नव्हतें असें नाहीं ! त्यानें तिची नानापरीनें समजूत घातली होती व त्याच्या उत्साही भाषेनें तर निर्मलेच्या मनांत कधींकाळी डोकावणारी शंका केव्हांच दूर पळून जात असे !

असेच एकामागून एक दिवस चालले होते !

निर्मला आतां केशवला सर्वस्वी विसरून गेली होती !

पण केशव ! त्याचा दुष्टपणा निर्मलेचा केसानें गळा कापून संपला नव्हता ! तिच्या ध्यानींमनीं नसतांनाही एक दिवस अचानकपणें तो तिच्या दारांत येऊन उभा राहिला !

बाहेरच्याच हॉलमध्यें कलेला खेळवित निर्मला बसली होती !

'काय निर्मलाताई ?' या केशवच्या हांकेनें ती एकदम दचकली !

'निर्मलाताई ?' न कळत तिच्या तोंडून आपलें नांव घेतलें गेलें !

तिला केशवची मनस्वी चीड आली ! तिनें कपाळाला आंठ्या घालून 'काय काम आहे' म्हणून केशवला विचारलें—

तिच्या तिरस्काराकडे दुर्लक्ष करून केशव एक पाऊल पुढें सरकला व एकदम निर्मला म्हणून त्यानें तिचा हात धरला !

आंगांत राक्षसी शक्ती संचारल्याप्रमाणें एक जोराचा हिसडा मारून निर्मलेनें त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेतला !

तिरस्काराची जागा आतां संतापातिशयानें घेतली होती !

निर्मलेचें तें अवसान पाहून केशवही क्षणभर दचकला !

' वेळ आली तर गोगलगायीप्रमाणें गरीब दिसणारी स्त्री वाघासारखी क्रूर बनते ' हें त्यानें नुसतें वाचलें होतें, पण त्याला आतां त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला होता !

' निर्मले ' आपल्या मनांतील भीति दूर करून दुसऱ्याच क्षणीं केशव म्हणाला, "झांशीच्या लक्ष्मीबाईसारखें अवसान तूं आणलेंस खरें, पण मी काय म्हणतों तें मुकाट्यानें ऐकून घे. मला आजच्या आज पांचशें रुपयांची जरुरी आहे—आणि तूं तें काय वाटेल तें करून दिलें नाहींस तर आपल्यांतील संबंधाची हकीकत मी तुझ्या आतांच्या नवऱ्याला सांगेन व तुझ्या संसाराचा सत्यानाश करून टाकीन ' !

केशवचे ते उद्गार ऐकून निर्मलेला तशाही स्थितींत हंसू आवरेना !

पुरुष स्वतःला जितके धूर्त समजतात, त्यापेक्षांही ते कितीतरी मूर्ख असतात असें तिला वाटलें !

आपल्या धमकीचा कांहींच परिणाम न होतां उलट निर्मला हंसत आहे हें पाहून केशवला कमालीचें आश्चर्य वाटलें !

ती वेडी तर झाली नाहीं? अशीही शंका त्याच्या मनांत आली !

' हें बघ केशव ' निर्मला त्याच्याकडे तिरस्काराचा एक दृष्टीक्षेप टाकून म्हणाली, "पुरुषांनीं जसें बोलावें तसें करून दाखवावें. उगीच पोकळ बडबड करण्यांत काय अर्थ आहे. आतां तूं येथून मुकाट्यानें चालायला लाग, नाहींतर मला उगीचच अधिक शोभा करावी लागेल !"

आतां तेथें उभें रहाण्यांत अधिक अर्थ नाहीं हें केशवनें ओळखलें व तो ' बरें आहे पाहून घेईन, ' एवढीच धमकी देऊन निघून गेला !

झालेल्या प्रकारानें निर्मलेला अतिशय वाईट वाटलें ! केशवच्या दुष्टपणाचा तिला पुरेपूर अनुभव आला होता, पण तो त्याच्यावर असा निर्लज्जपणाचा कळस चढवील असें तिला वाटलें नव्हतें !

तिला वाटलें कुठें प्रभाकर आणि कुठें केशव ?

एक हिरा तर दुसरी गारगोटी !

तथापि, झालेल्या प्रकारानें केशवची तिची स्मृती पुन्हां जागृत झाली. इतका वेळ कोचावर एकाकी असलेल्या कलेला ती विसरून गेली होती, पण आतां एकदम तिची तिला आठवण झाली !

ती त्याच आवेगांत पुढें झाली आणि झटकन कलेला आपल्या हृदयाशीं तिनें घट्ट धरलें ! जणूं केशव कलेला पळविणारच होता !

तिला वाटलें आतां ही कला सर्वस्वी माझी आहे—तिच्यावर केशवचा काय हक्क आहे ?

तिनें अत्यंत आत्मीयतेच्या भावनेनें कलेकडे पाहिलें व तिच्या गालाचें चुंबन घेतलें ! आपल्याकडे बघून कला हसत आहे असा तिला भास झाला !

सायंकाळीं प्रभाकर घरीं आल्यावर त्याला दुपारचा तो प्रकार सांगावा कीं सांगू नये, याचा विचार करूनही तिला आपल्या मनाशीं कोणताच निर्णय ठरवितां येईना ! शेवटीं प्रभाकरला झालेला प्रकार ऐकून उगीचच दुःख होईल म्हणून त्याला त्यांतील कांहींच सांगूं नये असें तिनें ठरविलें !

आपण प्रभाकरला सर्व हकीकत सांगितली—आतांपर्यंत आपण त्याच्याशीं एक शब्दही खोटें बोललों नाहीं, मग आजची हकिकत त्याला न सांगण्यांत आपण त्याच्याशीं प्रतारणा तर करीत नाहीं असें तिला क्षणभरच वाटलें !

तथापिहि त्याला कांहीं सांगावयाचें नाहींच असा तिनें आपल्या मनाशीं निश्चय केला ! सायंकाळीं प्रभाकर घरीं आला तो हंसत-मुखानेंच ! आज त्याला एक नवीनच व भरपूर प्राप्ती होणारें मोठें काम मिळालें होतें, आणि त्या आनंदाच्या भरांत त्यानें बाजारांत निर्मलेकरतां व कलेसाठीं अनेक वस्तू खरेदिल्या होत्या ! निरनिराळ्या

डिझाईन्सची नवी नवी फॅशनेबल पातळें, ब्लाऊझ, सँडल्स, कलेकरतां निरनिराळे सूटस् याचें जणूं एक लहानसें दुकानच प्रभाकरनें खरेदी करून आणलें आहे असें तिला वाटलें !

प्रभाकरनें प्रथम आपल्या हातांतील सामान टेबलावर ठेवलें व नित्याप्रमाणें कलेला उचलून घेऊन तिचा झटकन एक गोडसा पापा घेतला ! बाहेरून आल्यावर प्रथम कलेला घ्यावयाचें असा त्यानें निश्चयच केला होता ! आणि या त्याच्या कलेविषयींच्या आसक्तीमुळें निर्मला त्याला कधीं कधीं चेष्टेनें म्हणे—

'कलेच्या नादानें एखादे वेळीं मलासुद्धां विसराल बरें '?

आणि त्यावर ' कोणत्या कलेच्या या कीं त्या '? अशा प्रभाकराच्या कोटीक्रमानें दोघेंही हंसत असत.

प्रभाकरचा तो आनंदी व हंसतमुख चेहरा पाहून केशवनें केलेल्या अतिप्रसंगाची त्याला कांहींच माहिती सांगावयाची नाहीं हा तिनें केलेला निश्चय अधिकच दृढ केला.

थोड्या वेळानें कलेला निर्मलेच्या हातीं देऊन प्रभाकरनें आपल्या खिशांतून झटकन एक पुडी काढली व तिच्यावरचा दोरा सोडून आंतील टपोऱ्या मोगरीच्या फुलांची वेणी एकदम तिच्या नाकाशीं धरली.

मोगरीच्या फुलांच्या त्या मादक घमघमाटानें दोघांच्याहीं चित्त-वृत्तीं बहरल्या आणि तितक्यांतच निर्मलेच्यामागें होऊन प्रभाकरनें तिच्या आंबाड्यावर ती वेणी बांधली ! निर्मलेला अतिशय आनंद झाला आणि तिनें झटकन प्रभाकरकडे तोंड वळविल्याबरोबर त्यानें तिचें चुंबन घेतलें ! एखाद्या नवोढा तरुणीप्रमाणें निर्मलेचे गोरे गाल लाल झाले ! तिच्या त्या गोऱ्या व लाललाल गालाकडे प्रभाकर एखाद्या आधाशासारखा पहात होता ! निर्मला अधिकच लाजली व 'कला

पहातेय बरं का !' असें लटक्या रागानें तिनें प्रभाकरला उद्देशून म्हटलें !

दिवसामागून दिवस जात होते. एके दिवशीं सकाळीं पोस्टमननें आणून टाकलेलें पत्र प्रभाकरनें फोडलें व तें वाचून तो इतक्या जोरानें हंसू लागला कीं, आंतील बाजूस चहा करीत असलेल्या निर्मलेलाही तें ऐकूं गेलें व म्हणून ती उत्सुकतेनें बाहेर आली !

तिच्या पावलांचा आवाज ऐकल्याबरोबर प्रभाकरनें तिनें कांहीं एक विचारण्याच्या अगोदरच तिच्या अंगावर तें पत्र फेकलें व तो पुन्हां हंसू लागला !

मोठ्या उत्सुकतेनें निर्मलेनें तें पत्र वाचावयास सुरुवात केली आणि दोनचार ओळी वाचून झाल्याबरोबर खालीं सही पाहिली, तो ती केशव पंडितची आहे असें तिला आढळून आलें ! त्यानें आपली धमकी अशा तऱ्हेनें खरी केली होती !

प्रभाकरला या पत्रानें एवढें हंसू कां यावें याचें निर्मलेला आश्चर्य वाटत होतें, पण तिला फार वेळ गोंधळलेल्या स्थितींत ठेवणें बरें नाहीं असें वाटून प्रभाकर तिला म्हणाला, "निर्मला या प्राण्याचा उपद्व्याप पाहून मला त्याचा राग येण्याऐवजीं हंसू आलें. इथें तो कधीं आला तर त्याला खुशाल धक्के मारून हांकलून दे आणि आज स्वयंपाक करण्याकरतां शेगडी पेटवावयाची ती प्रथम या पत्रानें पेटव!"

प्रभाकरच्या या उद्गारांनीं निर्मलेला कमालीचा आनंद झाला ! त्याला आपण सर्व कांहीं सांगितलेलें आहे हें महित असूनही केशव-च्या त्या धमकीची तिला मनांतून थोडी भीति वाटत होती ! आणि दुपारीं जेवतांना तर " आज स्वयंपाक फारच गोड लागतोय बुवा, कारण त्या पत्राच्या ज्वालांचा चटका त्याला लागला आहे ना !" या प्रभाकराच्या कोटीनें तिच्या मनातील अंधुक भीति कुठल्याकुठें पळून गेली !

तिनें चोरट्या नजरेनें प्रभाकराकडे हळूंच पाहिलें ! त्या दृष्टींत त्याच्याविषयींचें गाढ प्रेम व कमालीचा आदर समावलेला होता !

× × ×

दुर्दैव म्हणून जगांत एक गोष्ट आहे व ती नेहमीं मनुष्याच्या संसारांत दु:खाचें बीष कालविण्यास टपून बसलेली असते, याची कल्पना येण्यासारखा एकही प्रसंग आतांपर्यंत प्रभाकर-निर्मला यांच्यावर आला नव्हता. केशवचें पत्र येऊन सुमारें आठदहा दिवस झालें होतें ! एके दिवशीं कलेला थोडासा ताप आला ! पहिल्या प्रथम त्या तापाचें स्वरूप फारच सौम्य होतें आणि तोंपर्यंत प्रभाकर आणि निर्मला यांना फारसें कांहीं वाटलें नाहीं. पण तीन दिवस झाल्यावरही ताप न उतरतां हळूंहळूं वाढतच चालल्याचें पाहून मात्र दोघांचेंही धाबें दणाणलें !

रात्रंदिवस कलेला मांडीवर घेऊन प्रभाकर व निर्मला आपापल्या जीवांचें पाणी करीत होते !

कलेचा एवढासा तो जीव पण त्याची चाललेली तगमग पाहून दोघांनाहि रडूं कोसळत असे ! प्रभाकर निर्मलेची समजूत करीत होता खरा, पण आंतून त्याचाच धीर खचला होता. आणि कलेला न्यूमोनिया झाल्याचें जेव्हां त्यांना डॉक्टरनीं सांगितलें तेव्हां निर्मलेला तर आपल्यावर आकाशच कोसळत आहे असें वाटलें !

तिच्या मातृहृदयाला होत असलेल्या वेदना पाहून प्रभाकरही बावरल्यासारखा झाला होता. शेजारीपाजारीही भरपूर मदत करीत होते. एके दिवशीं तर कलेची स्थिति फारच वाईट झाली व ती एकसारखी आंचके देऊन मान टाकूं लागली ! एवढासा तो जीव, पण त्याचे ते होत असलेले हाल पाहून सर्वांना अतिशय वाईट होतें व तें दृश्य न पाहविल्यामुळें मदतीकरितां आलेल्या शेजारीं बायकाही

बाजूला उठून जात असत ! निर्मलेला तर अगदीं वेड लागण्याची पाळी आली होती !

एका पाठीमागून एक अशा नामांकित व तज्ज्ञ डॉक्टरांच्या कसोशीच्या उपचारानेंही कलेच्या प्रकृतींत कांहींच फरक पडेना. उलट तिचा मृत्युमात्र जवळ जवळ येत चालला होता !

तिच्या त्या कोंवळ्या जिवाचे होत असलेले भयंकर हाल पाहून तिची लौकरच सुटका होईल तर बरें, असा उद्वेगाचा विचार प्रभाकरच्या मनांत आल्याबांचून राहिला नाहीं !

पाण्यांतून बाहेर काढलेला मासा जसा क्षणाक्षणला तडफडून मरतो, तशीच अवस्था थेट कलेची झाली होती ! अखेरीस चार दिवसांच्या आजारानंतर एके रात्रीं कलेचा ताप थोडासा कमीं झाला !

निर्मलेला वाटलें आतां कला बरी होणार !

पण तिला काय माहीत कीं, दिवा जाण्यापूर्वी एकदां मोठा होतो ? सुमारें तास दोन तासच तिचा ताप थोडासा कमीं झाला पण पुन्हां मध्यरात्रीच्या सुमारास कला आचके देऊं लागली व या कुशीवरून त्या कुशीवर असें एकसारखे मानेला झटके देऊं लागली !

तिचा मृत्यु आतां अगदीं समीप आला आहे हें प्रभाकरला पूर्णपणें कळून चुकलें होतें ! त्यानें आपलें मन दगडासारखें घट्ट केलें व कलेच्या मृत्युघटकेची तो वाट पाहूं लागला. निर्मलेला कला बरी होईल असें वाटत होतें !

कलेचें आंचके देणें हळूंहळूं कमी होऊं लागले व मानही बरेच क्षण एके ठिकाणीं स्तब्ध राहूं लागली ! तिच्या शरिरांतून बाहेर पडण्याकरितां जणूं तिचा लहानगा जीवही धडपड करीत होता. आणि अशा स्थितींत सुमारें तास दोन तास गेल्यावर पहांटेच्या सुमारास निर्मलेला एकाकी टाकून कला देवाघरीं चालती झाली !

कलेच्या मृत्युनें निर्मलेनें जो शोक केला त्याला पारावार नव्हता. आतां तिला वेड लागतें कीं काय, अशी भीति प्रभाकरला वाटूं लागली !

दोन तीन तास रडून रडून निर्मलेचे डोळे सुजले. त्यांतील अश्रू केव्हांच आटून गेले होते आणि तशा त्या ग्लान स्थितींतच तिला गुंगी आली ! तिला झोंप लागलेली पाहून प्रभाकरलाही बरें वाटलें व तो दिवाणखान्यांत आला !

आणि त्याच वेळीं इकडे मालतीबाईकडून मिळालेला पत्ता घेऊन विनोदिनी त्याचा शोध करीत करीत त्याच्या फ्लॅटपाशीं आली होती !

दरवाज्यावरच्या पितळी बोर्डावर ' श्री. प्रभाकर इनामदार ' ही सुबक वळणानें काढलेलीं अक्षरें पाहून विनोदिनीला फारच आनंद झाला ! तिनें अतिशय घाईनें पुढें होऊन दरवाज्यावर टिचकी मारली !

आपल्याच दुःखांत चूर असलेल्या प्रभाकराला प्रथम टिचकीचा बारीकसा आवाज ऐकूं आला नाहीं, पण ' प्रभाकर ' अशी बाहेरून मारलेली हांक ऐकून तो त्रासिक मुद्रेनेंच कोचावरून उठला व त्यानें आंतून लावलेली दरवाज्याची कडी काढली मात्र, त्याला दरवाज्यांतच विनोदिनी उभी असलेली दिसली आणि त्याच्या तोंडांतून ' कोण, विनोदिनी '? असे आश्चर्योद्गार बाहेर पडले !

अशा अकल्पितरितीनें विनोदिनी व प्रभाकराची आज दीर्घकालानंतर भेट झाली होती !

प्रभाकराचा तो दुःखीकष्टी चेहेरा पाहून विनोदिनीला आश्चर्य वाटलें आणि ती कांहीं विचारणार तोंच प्रभाकरानें तिला कलेच्या मृत्युची हकीकत सांगितली. कला गेल्यानंतर आपल्याला विनोदिनी भेटावी हा प्रभाकराला अकल्पित योगायोग वाटला ! प्रभाकराला चार सांत्वनाचे शब्द सांगून विनोदिनी आंत गेली, तेव्हां निर्मला जागी

झाली होती ! विनोदिनी तिच्या शेजारीं कॉटवर जाऊन बसली व तिचा दुःखभार हलका होईल अशा चार गोष्टी तिनें तिला सुनावल्या.

विनोदिनी मालतीबाईकडून एक दिवसांची रजा घेऊन आली होती पण प्रभाकर निर्मला यांची दुःखीकष्टी स्थिति पाहून तिनें तेथेंच चार दिवस रहावयाचें ठरविलें !

त्या अवधींत निर्मलेचें दुःख बरेंच कमी झालें होतें आणि म्हणून एके दिवशीं संधी साधून प्रभाकरला तिनें आपली सर्व हकीकत कांहींएक आडपडदा न ठेवतां सांगितली ! तिची हकीकत ऐकून प्रभाकरालाही फार वाईट वाटलें व त्यानें तिला मालतीबाईकडची नोकरी सोडून आपल्याकडेच रहाण्यास सांगितलें !

विनोदिनीला तेंच हवें होतें आणि म्हणून तिनें फारसे आढेवेढे न घेतां प्रभाकराच्या म्हणण्याला संमती दिली ! मालतीबाईनींही मोठ्या कष्टानें विनोदिनीला जाण्याची परवानगी दिली.

## — १३ —

मुंबईकडे जाणारी गाडी झपाट्यानें मार्ग कापीत चालली होती.

विनोदिनीची भेट घेण्याकरतां मुंबईस चाललेला जगन्नाथ एका सेकंडक्लासच्या डब्यांतील आपल्या बर्थवर डोळे मिटून स्वस्थ पडला होता. त्याच्या मनांत अनंत विचारांनीं काहूर माजविलें होतें. आपण मुंबईला चाललों आहोंत खरें, पण विनोदिनीची आपली भेट होईल किंवा नाहीं व भेट झाली तरी त्यापासून कांहीं निष्पत्ती होईल किंवा काय, या विचाराच्या द्विधा मनःस्थितींतच तो होता !

गाडी वायुवेगानें स्टेशनामागून स्टेशनें पाठीमागें टाकून पुढें चालली होती. स्टेशनजवळ आल्यावर सांधे बदलतांना ‘ खाडखाड’ असा आवाज झाला म्हणजे जगन्नाथ विचारांच्या तंद्रींतून जागा

होत असे. जितक्या वेगानें गाडी चालली होती तितक्याच,किंबहुना त्यापेक्षांही जास्त वेगानें त्याच्या डोक्यांतील विचारचक्रें फिरत होतीं.

विचारांनीं डोकें सुन्न झाल्यामुळें मध्यंतरीं एका स्टेशनावर तो चहा घेण्यास म्हणून खालीं उतरला व चहा घेऊन झाल्यावर बुक-स्टॉलवर जाऊन त्यानें वेळ घालविण्यास उपयोगी पडावें म्हणून एक पुस्तक विकत घेतलें.

उर्सुला ब्लूमचें 'अवर लेडी ऑफ दी मार्बल' हें तें पुस्तक होतें. कांहीं पानें वाचून झालीं नाहींत तोंच जगन्नाथ त्या पुस्तकाशीं अतिशय समरस झाला !

त्याला वाटलें या कादंबरींतील नायक इलियट म्हणजे आपण व नायिका व्हिरोनिका म्हणजे विनोदिनीच आहे !

आणि या विचारांनीं तर त्यानें ती कादंबरी जास्तच आत्मिय-तेनें वाचावयास सुरुवात केली !

'स्त्रीला भावना असतात—तारुण्यसुलभ मोह असतो आणि त्या मोहांतून निर्माण होणारे विकार कधीं कधीं तिचा पराभव करतात' ही त्यांतील व्हिरोनिकाची विचारसरणी आणि मालतीच्या बाबतींत विनोदिनीनें व्यक्त केलेली विचारसणी यांत इतकें साम्य असलेलें पाहून त्याला आश्चर्य वाटलें !

आणि शेवटीं, इलियट आपला 'पराभव' कबूल करून व्हिरो-निकाचा आपली पत्नी म्हणून स्वीकार करतो, हा प्रसंग तर त्याला फारच आवडला !

त्याला वाटलें,या कादंबरीसारखाच शेवट लाभण्याचें भाग्य आपलें आहे का ?

आणि या विचारानें तर विनोदिनीच आपल्यापुढें प्रत्यक्ष उभी आहे—तिच्या हातांत पुष्पमाला आहे—नंतर तिला आपण जवळ

ओढून घेतली—तिनें तीं पुष्पमाला आपल्या गळ्यांत घातली आणि आपण तिचें एकदम गोडसें चुंबन घेतलें, असा त्याला क्षणभर भास झाला!

पण तो केवळ भासच होता!

भावी आयुष्यानें त्यानें तें आपल्या मनःचक्षूं पुढें सुखस्वप्न उभें केलें होतें!

दुसऱ्याच क्षणी त्याच्या डोळ्यापुढें मालतीचा तो दीनवाणा चेहेरा आला. ती आपल्या डोळ्यांतील आग आपल्यावर ओतीत आहे असेंच त्याला वाटलें!

हें मालतीचें भूत आपल्याला आतां जन्मभर असेंच छळणार कीं काय, या कल्पनेनें तर त्याचें आंग शहारलें आणि त्यानें आपल्या आंगाभोंवतीची शाल अधिकच लपटून घेतली! तथापि, मालतीचे विचार त्याच्या डोक्यांतून कांहीं केल्या जाईनांत आणि तें घालविण्याकरतां म्हणून त्यानें ते पुस्तक पुन्हां वाचावयास सुरुवात केली!

'अवर लेडी ऑफ दी मार्बल' मधील इलियटचा शेवटीं पराभव झाला होता!

पण त्यांत पराभवाच्या दुःखाचा मागमूसही नव्हता आणि व्हिरोनिकाचा विजय झाला होता तरी, त्यांत विजयाचा आनंद फारच थोडा होता!

इलियटच्या वाट्याला जो 'पराभव' आला तो आपल्याही येईल का—आला तर किती बरें होईल, असें त्याला वाटलें! आपल्या या विचारसरणीबद्दल त्याचें त्यालाच कौतुक वाटूं लागलें! एकेकाळीं आपलीं मतें काय होतीं आणि त्याचें इतकें परिवर्तन कसें झालें हें त्याचें त्यालाच कळत नव्हतें!

तारुण्यसुलभ भावनांचा ह्या विजय कीं—

त्या भावनांनी आपल्या मनाचा केलेला पराभव, हें कोडें त्याचें त्यालाच सुटेना !

या विचारांच्या तंद्रींतूनच दुसरे अनेक विचारतरंग त्याच्या मनांत आले !

त्यानें त्या विचाराच्या भरांतच असें ठरविलें कीं, आपण विनोदिनीचा स्वीकार करावयाचा, पण तो एका अटीवर !

तिनें आपलें मूल आपल्याजवळ ठेवता कामा नये !

या निश्चयानें त्याला थोडेसें समाधान वाटलें !

पण त्याला हें माहित नव्हतें कीं, आपल्या अपत्याकरतां स्त्री-वेळीं प्रत्यक्ष पतीचासुद्धां त्याग करते !

या सर्व विचारांनी म्लान झालेलें त्याचें मन कांहीं वेळानें झोपीं गेलें आणि त्याला जाग आली ती एकदम बोरीबंदर स्टेशनवर गाडी आल्यावरच ! आपल्या डब्यांतून तो खालीं उतरला ! कुठें जावयाचें व विनोदिनीचा शोध कसा करावयाचा याचीं त्यानें आपल्या मनाशीं कांहीं रूपरेषा आंखलेली नव्हती. तो सरळ एका हॉटेलांत उतरावयास गेला आणि दुपारीं जेवणखाण झाल्यावर आपल्या पुढील उद्योगाला लागावयाचें असें त्यानें ठरविलें !

आणि दुपारीं जेवण झाल्यावर त्यानें विनोदिनीचा पत्ता बघण्याकरतां म्हणून तिचें माईसाहेबांना आलेलें पत्र काढलें, तो त्यावर तिनें आपलाच पत्ताच लिहिलेला नाहीं असें त्याला आढळून आलें !

त्या निराशेच्या झटक्यानें तो अतिशय खट्टू झाला ! आपल्या हातापायांतील शक्ती गळून गेल्यासारखें त्याला वाटलें आणि त्या निराशमय मनःस्थितींतच त्याच्या डोळ्यांतून पडलेल्या दोन अश्रूंनीं त्या पत्रांतील विनोदिनीनें लिहिलेली ‘ जगन्नाथ ’ हीं अक्षरें पुसटली गेलीं ! या घटनेमुळें तर त्याचें मन अधिकच खिन्न झालें !

या पत्रांतील आपल्या नांवाप्रमाणें आपणसुद्धां बिनोदिनीच्या अंत:करणांतील आपल्याविषयींच्या प्रेमभावनेपासून कोठेंतरी दूर दूर दकलले-जात आहोंत--तिच्या मनांतील आपली मूर्ती भंग पावत आहे. असें त्याला वाटलें ! आपल्या चुकीमुळें आपणांस सबंध आयुष्यभर दु:ख करावें लागणार असें वाटून तो अत्यंत निराश झाला !

बिनोदिनीची ती हंसरी मूर्ती त्याच्या डोळ्यांपुढें एकसारखी उभी राहून त्याला बेचैन करीत होती !

काय करावें आणि करूं नये असें त्याला झालें आणि बिनोदिनीचा पत्ता नाहींतर नाहीं. निदान प्रभाकरचा तरी पत्ता काढावा म्हणजे निदान तेथें आपल्याला बिनोदिनीचा पत्ता लागेल असें त्याला वाटलें.

प्रभाकर त्याच्या चित्रकलेमुळें मुंबईत पुष्कळांना माहित झाला होता, आणि म्हणून त्याचा पत्ता मिळवावयास त्याला फारशी अडचण पडली नाहीं !

दुपारीं चहा घेऊन तो त्या पत्त्यावर गेला, पण त्याच्या दुर्दैवानें आदल्याच दिवशीं प्रभाकर ती जागा सोडून गेला होता व त्यानें दुसरीकडे कुठें जागा घेतली तें शेजाऱ्यांना माहिती नव्हतें. फक्त त्यांच्या मुलीचा--कलेचा त्या जागेंत मृत्यू झाल्यामुळें त्यानीं ती जागा बदलली असल्याचें त्याला कळलें !

निराशेचा हा दुसरा आघात त्याच्या मनावर झाला होता !

जिथें जावें तिथें त्याच्या पदरीं निराशाच पडत होती !

अत्यंत असहाय्य व विकल मन:स्थितींतच तो आपल्या खोलींत परत आला व अंगांतील कपडे न काढतांच त्यानें आपल्या कॉटवर आंग टाकलें !

आपल्याकडे बघून मारती विकट हास्य करीत असल्याचा त्याला भास झाला ! तिच्या डोळ्यांत सूडाची भावना भरली आहे असें

त्याला वाटलें! त्यानें आपलें डोळे घट्ट झांकून घेतले पण कांही केल्या मालती त्याच्या डोळ्यापुढून हलेना!

थोड्या वेळानें त्याच्या डोक्यांतील विचारचक्र दूर झालें आणि त्याच दिवशीं सायंकाळच्या गाडीनें परत जावयाचें असें ठरवून त्यानें आपला बेत पार पाडलाही!

## — १४ —

प्रभाकरचा पत्ता लागून त्याच्या प्रेमळ सहवासाचा आधार मिळाल्यामुळें आज किती तरी दिवसांनीं विनोदिनीला खरें मनःस्वास्थ्य लाभलें होतें. माईसाहेब आणि जगन्नाथ यांना सोडून मुंबईस आल्यावर व पुढें गुरुनाथची भेट होऊन त्याचा तो भयंकर मृत्यु होईपर्यंतच्या काळांत अनेक घटनांनीं तिच्या मनःस्वास्थ्याचा भंग केलेला होता!

आपल्या गतायुष्याचा चित्रपट तिच्या डोळ्यापुढून भराभर सरकूं लागला! त्या चित्रपटांत सुखदुःखाचे अनेक प्रसंग होते! ज्या दुर्दैवाचा फटकाऱ्यानें तिच्या भावी आयुष्याच्या सुखस्वप्नांचा चुराडा करून टाकला होता, तो गुरुनाथाच्या मृत्युचा प्रसंग मात्र ती कांहीं केल्या विसरूं शकत नव्हती! कोणत्याहि स्थितींत ती गुरुनाथला विसरणें अशक्य होतें!

विचारांच्या तंद्रींत असतांनाच तिला आज फार दिवसांनीं माईसाहेबांची आठवण झाली! आपल्या पत्राचें उत्तरसुद्धां त्यांनीं पाठविलें नाहीं! तिला त्यांच्या स्वभावाचा जो परिचय होता, तो फार वेगळा होता आणि त्यांच्याकडून पत्र आलें नाहीं याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटत होतें!

आपल्या घरीं आल्यावरसुद्धां विनोदिनीची दुःखीकष्टीवृत्ती तशीच कायम असल्याचें पाहून प्रभाकर-निर्मला यांनाही वाईट वाटत होतें.

निर्मला बिचारी तर कलेच्या मृत्युमुळें फारच हैराण झाली होती. मातृत्त्व प्राप्त होण्यापूर्वी सर्वच स्त्रियांना अनेक कष्ट सहन करावे लागतात हें खरें असलें तरी निर्मलेनें शारीरिक कष्टांबरोबर मानसिक कष्टही सोसले होतें ! तिच्या जागीं दुसरी एखादी हलक्या मनाची तरुणी असती तर नदी किंवा विहिर यांचा तिनें केव्हांच आश्रय घेतला असता ! पण केशवच्या विश्वासघातकी वर्तनामुळें अंतःकरण दुभंगलें होतें तरी पुढील आशेनें तें तिनें घट्ट केलें !

जीव तर द्यावयाचा नाहींच, पण जगाशीं झगडावयाचें असा तिनें आपल्या मनाशीं त्याचवेळीं निश्चय केला !

आणि तिच्या सुदैवानें तिला प्रभाकरचा आधार मिळून ती आज अत्यंत सुखांत होती. त्या सुखांत दुःख म्हणजे नुकताच कलेचा झालेला वियोग हें होतें !

विनोदिनीला प्रभाकराकडे येऊन आतां पंधरा दिवसांच्यावर अवधी झाला होता. मधून मधून ती मालतीबाईंना भेटून येत असे ! त्यांच्या प्रेमळ व सहानुभूतीच्या वागणुकींमुळें त्यांच्याबद्दल तिला कमालीचा आदर वाटत असे ! आपल्या समाजांत मालतीबाईसारख्याच सर्व स्त्रिया असतील तर खरोखरीच किती बरें होईल ? असें तिला वाटे आणि मालतीबाईंना तसें ती बोलूनही दाखवी ! यावर मालतीबाई नुसत्या हंसत असत !

आणखी कांहीं दिवस असेच निघून गेले आणि त्या तिघांच्या संसारांत होऊं घातलेली भयंकर वादळाचीं चिन्हें म्हणून कीं काय कोणास ठाऊक निर्मलेच्या स्वभावांत एकदम फरक पडलेला प्रभाकर-विनोदिनीला आढळून आला !

त्यांनीं प्रथम त्याच्याकडे कांहीं दिवस दुर्लक्ष केलें ! हें गूढ काय आहे हें त्यांना कांहीं केल्या समजेना !

पण थोड्याच दिवसांत निर्मलेचा सर्व रोख विनोदिनींवर आहे

असें प्रभाकरला आढळून आल्यावर मात्र तो भयंकर संतापला ! स्त्रीहृदयाचे त्यानें फारच थोडे नमुनें पाहिले होते आणि निर्मलेचा त्याला आतां जो अनुभव येऊं लागला होता, त्यामुळें संतापाबरोबरच त्याला तिची चीडही आली ! निर्मलेच्या धुसफुशीचा एक दिवस अचानक स्फोट झाला ! त्या दिवशीं सकाळींच निर्मला कोठेंतरी बाहेर कामास गेली होती आणि बिनोदिनी व प्रभाकर एकमेकांशीं बोलत बसले होते. पुन्हां आपली हकीगत सांगतांना बिनोदिनीच्या डोळ्यांत पाणी आलें आणि तिचें सांत्वन करण्याकरितां म्हणून प्रभाकर आपल्या खुर्चीवरून उठून तिच्याशेजारीं कोचावर जाऊन बसला !

इतक्यात बाहेरून निर्मला घरांत आली आणि तिनें त्या दोघांना कोचावर एकमेकांजवळ बसलेले पाहून तिला मनस्वी राग आला आणि कांहीं एक न बोलतां ती त्यांच्याकडे रागाचा कटाक्ष टाकून आंतील बाजूस निघून गेली !

तिच्या डोळ्यांतील असूयेची चमक दोघांनाही स्पष्टपणें दिसली. त्याच पावलीं प्रभाकर ताडकन उठून घरांत गेला आणि निर्मलेच्या दंडाला धरून त्यानें तिला बाहेर आणलें !

बिनोदिनी झालेल्या या प्रकारानें स्तंभित होऊन कोचावर डोकें टेंकून स्वस्थ बसली होती !

तिच्या स्त्रीहृदयानें निर्मलेच्या मनांत कोणता संशय थैमान घालीत आहे हें केव्हांच ओळखलें होतें आणि त्याचेंच तिला सर्वांत जास्त दुःख होत होतें !

‘ स्त्री हीच स्त्रीचा अधिक शत्रु आहे ’ हा अनुभव तिला निर्मले-कडून आणखी एकदां अनुभवावयास मिळाला होता !

प्रभाकरानें मात्र या प्रकरणाचा सोक्षमोक्ष केल्याशिवाय रहा-वयाचें नाहीं असा निश्चय केला.

'निर्मला' प्रभाकर तिला उद्देशून म्हणला, "मला तुझा राग येण्याऐवजीं खरोखर कींव येतें. संकटांचे घाव तूं सोसले आहेस, स्त्रियांवर कोणकोणते प्रसंग ओढवतात त्याची तुला पूर्ण कल्पना आहे, आणि इतकें असूनही तुला या बिनोदिनीबद्दल सहानुभूती वाटण्याच्या ऐवजीं तिचा सवतीमत्सर वाटूं लागला आहे. या मत्सरानें तूं माझ्यावरही अन्याय केला आहेस. समाजाचे फटके सोसूनही मी तुझ्याशीं एकनिष्ठ राहिलों आहे आणि तूं थोड्याच काळापूर्वींची आपली परिस्थिती विसरून एका दीन स्त्रीवर आपल्या मत्सराची आग ओतून पर्यायानें माझ्यावरही आघात करीत आहेस! तुला मी एकदांच सांगतो कीं, बिनोदिनी माझी खरी बहीण नसली तरी तिचें आणि माझें नातें सख्ख्या बहिण-भावा इतकेंच पवित्र आहे!"

प्रभाकरच्या या मर्मभेदक भाषणानें निर्मलेला अत्यंत वाईट वाटलें!

आपण केलें तें चूक कीं बरोबर, याचा निर्णय तिचा तिलाच देतां येईना! पण प्रभाकर तिच्याशीं आजपर्यंत एका अक्षरानेंही खोटं बोलला नव्हता, हें तिला माहित होतें! त्याला कांहीं करावयाचेंच असतें तर त्याकरतां त्यानें आपली मुळींच पर्वा केली नसती हेंहीं तिला पक्कें माहित होतें, आणि म्हणूनच प्रभाकराबद्दल आपण अशा तऱ्हेनें घाणेरडा संशय घेतल्याबद्दल तिला पश्चाताप झाला आणि झालेल्या प्रभाकराबद्दल तिनें बिनोदिनीची अक्षरशः क्षमा मागितली आणि प्रभाकराकडे अशा दृष्टीनें पाहिलें कीं, प्रभाकर काय समजावयाचें तें समजून गेला!

तो अधिक कांहींच बोलला नाहीं आणि त्या घरांत निर्माण झालेलें तें वादळ अखेर पेल्यांतील वादळच ठरलें!

त्या दिवसापासून निर्मलेच्या वागणुकींत फारच फरक पडलेला बिनोदिनीला आढळून आला!

वहिणीचें प्रेम—मातेचें वात्सल्य या सर्वांची प्रचिती तिला आतांशा निर्मलेच्या वागणुकींत येऊं लागली होती !

निर्मलेनें आपल्या पाठीवरून हात फिरविला कीं तिला आपली आईच प्रत्यक्ष आपल्या पाठीवरून हात फिरवित आहे असें वाटे ! तिला तिची आई माहित नव्हती. पण आई इतकेंच प्रेमळपणानें तिचें माईसाहेबांनी पालन-पोषण केलें होतें ! तोच प्रेमळ स्पर्श तिला निर्मलेच्या हातांत अनुभवास येत होता.

काळ झपाट्यानें आपलें क्रमण करीत होता !

विनोदिनीचे प्रसूतीचे दिवस जसजसे जवळ येऊं लागले तशी त्या सर्वांची एकच धांदल उडाली आणि एके दिवशीं त्यांच्या घराच्या शेजारच्याच हॉस्पिटलमध्यें विनोदिनी प्रसूत होऊन तिला मुलगी झाली.

तिच्या त्या मातृत्व-प्राप्तींत सुखदु:खाची भावना संमिश्र झालेली होती. सृष्टी नियमाप्रमाणें हळूहळू विनोदिनी गुरुनाथची आठवण विसरत चालली होती. ती पुन्हां ताजी करण्याकरतांच म्हणूनच कीं काय कोणास ठाऊक त्या मुलीच्या चेहेऱ्याची ठेवण सर्वस्वी गुरुनाथाच्या चेहेऱ्याशीं जुळती होती !

तिचे डोळे तर अगदीं थेट गुरुनाथासारखेच आहेत असें विनोदिनीला वाटलें ! अपत्य प्रसवानें विनोदिनीला जितका आनंद झाला होता, तितकेंच आतां पुढें काय या विचारानें दु:खही होत होतें.

प्रभाकरचा आश्रय तिला होता, पण तो कांहीं जन्मभर पुरणार नव्हता. स्वत:चें व्यक्तिमत्त्व कायम टिकविण्याकरतां—आपल्या मुलीच्या भावी सुखाकरतां आपल्याला काहींतरी केलें पाहिजे असें तिला सारखें वाटे !

पण काय करावयाचें याचा निर्णय अनेक दिवस विचार करूनही तिचा तिलाच देतां येईना. तिच्या त्या विचारांची तंद्री मुलीच्या

रडण्यानेंच भंग पावत असे आणि ती रडावयाची थांबल्यावर दुप्पट जोरानें तिच्या डोक्यांतील विचारचक्र जागृत होत असे. अखेर विचार करकरून तिनें याबाबतींत प्रभाकरचा सल्ला घेऊन मगच पुढें काय करावयाचें ते करावें असें ठरविलें !

निर्मलेच्या आग्रहावरून त्या मुलीचें नांव कलाच ठेवण्यांत आलें !

विनोदिनीपेक्षांही जास्त निर्मलेलाच कलेबद्दल अधिक आसक्ती वाटत होती. विनोदिनीचें कलेवरील प्रेम हें अपत्यवात्सल्यानें पूर्णपणें भारावलेलें होतें. तर निर्मलेला आपली कायमची हरवलेली कलाच पुन्हा सांपडली आहे असें वाटत होतें. कलेबद्दलची तिची ही आसक्ती पाहून प्रभाकर कधीं कधीं चेष्टेनें म्हणेसुद्धां कीं, ' निर्मला सांभाळून अस नाहीं तर पुढेंमागें त्या छोट्या जिवाची पंचाईत व्हावयाची. आपली आई कोण हेंसुद्धां तिला ओळखतां येऊं नये इतकें प्रेम तुम्ही दोघी तिच्यावर करतां—याचा कांहींतरी विचार करा."

आणि प्रभाकरच्या या चेष्टेनें तर निर्मलेला आपल्या अंगावर मूठभर मांस चढल्यासारखे वाटे !

जणूं ती मागें विनोदिनीवर केलेल्या अन्यायाची अशा तऱ्हेनें भरपाईच करीत होती !

विनोदिनीचा पत्ता मुंबईत न लागल्यामुळे निराश होऊन परत आल्यापासून जगन्नाथाच्या वृत्तींत व वागणुकींत विलक्षण फरक पडला होता आणि तशांत एक दिवस हृदयक्रिया बंद पडून माई-साहेबांच्या अचानक झालेल्या मृत्युमुळें तर जगांतील आपला एक मोठाच आधार तुटल्यासारखें त्याला वाटलें !

विनोदिनीचा आणि आपला विवाह माईसाहेबांच्या इच्छेप्रमाणें

त्यांच्या डोळ्यादेखत झाला नाही—त्यांची इच्छा अपुरी राहिली याबद्दल तर त्याचें मन एकसारखें खात होतें !

आणि हा सर्व परिणाम आपल्या चुकीच्या विचारसरणीचा—हट्टाग्रहीवृत्तीचा-आपलें तेंच खरें धरून चालणाचा व दुसऱ्याकडे सहिष्णुतावृत्तीनें न पहाण्याचा आहे हें त्याला आतां अनुभवानें पटलें होतें !

हा अनुभव त्याला अतिशय महाग पडला होता ! अनुभव मिळविण्याकरतां कधीं कधीं फार मोठी किंमत द्यावी लागते हें त्यानें कुठेंतरी वाचलें होतें !

पण त्याला जो अनुभव आला होता, त्याला त्याची केवढी जबरदस्त किंमत द्यावी लागली होती !

कदाचित त्याच्या आयुष्यांतील सर्व सुखांचें बलिदान त्याला करावें लागणार होतें !

विनोदिनीची आपली भेट होईल—तिला आपण आपली सहचारिणी बनवूं व मागील चुकांचें परिमार्जन करूं शकूं अशी अंधुकशी आशा त्याला वाटत होती !

या आशेला पालवी फुटावयाची म्हणजे विनोदिनीची भेट होणें अवश्यक होतें आणि तीच तर मोठी अडचण होती !

काय करावें आणि काय करूं नये या विचारांनीं डोकें सुन्न झालें म्हणजे तें शांत करण्याकरतां म्हणून तो बागेंत फिरत असे ! आणि इकडून तिकडे येरझारा घालतांना त्याला कधीं कधीं तो संगमरवरी पुतळा आपल्याकडे बघून खदखदा हंसत आहे असा भास होई. 'त्या पुतळ्याइतकाच तूं विचारानें निर्जिव—भावनाशून्य व थंड आहेस' हे विनोदिनीचे मर्मभेदक शब्द त्याला कधीं कधीं आठवत !

त्यावेळीं त्याला आपली संगमरवरी पुतळ्याशीं तुलना केल्याबद्दल विनोदिनीचा भयंकर संताप आला होता, आणि आज—आज तिचे

ते उद्गार अगदीं अक्षरश: खरे आहेत असें त्याला स्वत:लाच अनुभवानें पटलें होतें ! आपल्या मनाशीं तशी त्यानें कितीतरी वेळां कबूली दिली होती !

बागेंतून फिरतांना एखादे वेळीं एखादें गुलाबाचें अर्धोन्मिलित असें कोमेजलेलें फूल दृष्टीस पडलें कीं, त्या फुलाशीं स्वत:च्या आयुष्याची तुलना केल्याशिवाय त्याला राहवत नसे !

त्याला वाटे आपलेंही आयुष्य या गुलाबाच्या फुलासारखें अर्धवट स्थितींतच कोमेजणार कीं काय ?

आणि या विचारानें त्याच्या मनांत उगम पालवलेल्या अंधुक आशा नाहींशी होऊन त्याची जागा निराशा घेई !

जळीं-स्थळीं-पाषाणीं, झोंपेंत—स्वप्नांत त्याला विनोदिनीशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहींसें झालें होतें !

केवळ स्त्रीच्या आकर्षणानेंच त्याला विनोदिनीविषयीं इतकी आसक्ती वाटत नव्हती. तसें असतें तर त्याला आपली नक्षत्रासारखी मुलगी हुंड्याच्या भल्यामोठ्या रकमेसह द्यावयास कितीतरी मुलींचे पालक तयार होते !

विनोदिनीविषयीं निर्माण झालेल्या आसक्तींत त्याच्या पुरुषह्याला हवाहवासा वाटणारा केवळ स्त्रीसहवासच नव्हता ! विनोदिनीवर त्याचें जें गाढ प्रेम होतें त्यांतूनच तिच्याविषयींची इतकी आसक्ती त्याच्या मनांत निर्माण झाली होती !

आणि म्हणूनच त्याला सांगून आलेल्या कित्येक सुंदर सुंदर मुली त्यानें निराश करून पाठविल्या होत्या !

विनोदिनीनें त्याला त्याच्या एका वाढदिवशीं बक्षिस दिलेला एका सुंदर स्त्रीचा लहानसा संगमरवरी पुतळा म्हणजे तर त्याचा आजकाल जीव कीं प्राण होऊन बसला होता !

तो पुतळा आपल्या डोळ्यापुढें ठेवून त्याच्याकडे टक लावून बघण्यांत तासनातास तो घालवित असे !

त्या पुतळ्याच्या रूपानें आपल्यापुढें विनोदिनीच उभी आहे असा त्याला कधीं कधीं भास होई, आणि तशा त्या संभ्रमलेल्या मनःस्थितींत त्या पुतळ्याचा हात तो आपल्या हातांत घेई व त्याचा थंडपणा हाताला जाणवला म्हणजे तो भानावर येई !

दिवसांमागून दिवस असेच चालले होते. आपली चूक झाली-आपला पराभव झाला—नुसता पराभव नव्हे—अगदीं सपशेल पराभव झाला अशी कबुली अगदीं मोकळ्या मनानें विनोदिनीजवळ देऊन तिचा लुसलुशीत हात आपल्या हातांत कधीं एकदां घेईन असें त्याला झालें होतें !

विचारांनीं भारावलेलें मन हलकें करण्याकरतां म्हणून तो नानातऱ्हेचे उद्योग करण्याचा प्रयत्न करीत असे आणि असेंच एके दिवशीं माईसाहेबांच्या ट्रंकेची उलथापालथ करीत असताना त्याला त्याच्या नांवाचें एक बंद पाकीट आढळलें ! त्याला फारच आश्चर्य वाटलें ! माईसाहेबांना लिहितां येत नव्हतें हें त्याला माहित होतें. तथापिही त्यानें अत्यंत उत्सुकतेनें तें पत्र फोडलें व त्यावरून त्यानें अत्यंत अधिरतेनें नजर फिरवावयास सुरुवात केली.

खालीं मोडक्यातोडक्या अक्षरांत ‘ तुझी माई ’ अशी सही असल्याचें त्याला दिसलें आणि मग तर त्याची उत्सुकता फारच वाढली !

‘ जगन्नाथ,’ माईसाहेबांनीं लिहिलें होतें, “ मला स्वतःला लिहितां येत नाहीं पण दुसऱ्याकडून हें पत्र तुला मी लिहित आहे. तुला आठवत असेल एकदां मी तुझा आणि विनोदिनीचा विवाह व्हावा अशी माझी फार मनिषा आहे असें तुला बोलून दाखविलें होतें, आणि तुम्हीं दोघांनीं माझी इच्छा पुरी करण्याचें ठरविलें होतें;

पण मध्यंतरीं अशी कांहीं चमत्कारिक परिस्थिती निर्माण झाली कीं त्यामुळें माझी इच्छा पूर्ण झाली नाहीं.

माझ्या दुसऱ्या एका ट्रंकेंत तुला आणखीं एक बंद केलेलें पाकीट आढळेल. त्यांत तुला न कळत मी मृत्युपत्र करून ठेवलें आहे. तें वाचल्यावर तुला आढळेल कीं, आपल्या सर्व इस्टेटीचे मी तीन भाग केले असून, त्यांपैकीं एक तुला, एक प्रभाकरला व एक विनोदिनीला मी दिला आहे. माझी अजूनही अशी इच्छा आहे कीं, तूं विनोदिनीशीं विवाह करावास. माझ्या तळमळणाऱ्या आत्म्याला सुखशांती लाभावी असें तुला वाटत असेल तर माझी अतृप्त इच्छा तूं पुरी कर !'

माईसाहेबांचें हें पत्र वाचून तर जगन्नाथाचें मन अधिकच अस्वस्थ झालें. केवळ माईसाहेबांच्या इच्छे करतांच नव्हे, तर त्याला स्वतःलाही विनोदिनीला भेटण्याची–तिच्याशीं विवाहबद्ध होण्याची फार ओढ लागली होती. पण विनोदिनीच कुठें होती ?

त्या पत्रानें त्याची खिन्नता अधिकच वाढली ! कोठल्याही गोष्टींत त्याचें मन रमेना !

आपल्याला आतां विचाराच्या अतिरेकानें वेड लागतें कीं काय अशी त्याला भीति वाटूं लागली आणि मुंबईहून जर प्रभाकराचें अचानक आलेलें पत्र त्याला मिळालें नसतें, तर तो खरोखरच वेडा झाला असता.

प्रभाकराचें बंद पाकिटावरील हस्ताक्षर पाहून त्याची कोमेजलेली मनोवृत्ती एकदम बहरली. विलक्षण अधिरतेनें त्यानें तें पाकिट फोडलें. प्रभाकरानें लिहिलें होतें—

"जगन्नाथ फार दिवसांनीं आज मी तुला पत्र लिहित आहे म्हणून तुला आश्चर्य वाटत असेल. तथापि, आज पत्र लिहिण्याशिवाय गत्यंतरच नाहीं अशी वेळ आली आहे. ज्या विनोदिनीवर तूं एकेकाळीं जिवाभावानें प्रेम केलेस ती

नुकतीच प्रसूत होऊन तिला मुलगी झाली आहे. आतांतरी तुझ्या मनोवृत्तींत फरक पडला असेल व तूं विनोदिनीचा स्वीकार करून तिच्याबरोबर आपल्यालाही सुखी करशील अशी मला आशा आहे विनोदिनी तुझी एकसारखी वाट पहात आहे. ''

प्रभाकराच्या या पत्रानें आपला फार मोठा हरवलेला ठेवा अचानक सांपडल्यांवर एखाद्या कृपण माणसाला जसा आनंद व्हावा, जितकाच आनंद जगन्नाथाला झाला. दोनतीन वेळां पत्र वाचूनही त्याच्या मनाचें समाधान झालें नाहीं. त्यानें त्या पत्राची पारायणें केलीं. त्या पत्रांतील विनोदिनी या अक्षरांवर त्याची नजर बराच वेळ खिळून राहिली होती व त्या अक्षरांतून विनोदिनीच आपल्याशीं बोलत आहे असें त्याला वाटलें !

आपल्याला पक्षांसारखें पंख असतें तर आपण उड्डाण करून विनोदिनीला भेटलों असतो व तिला आपल्या हृदयाशीं घट्ट धरून सुखाच्या संसाराला त्या क्षणापासून सुरुवात केली असती, असा विचार या वेळीं त्याच्या मनांत आला !

शरिरानें तो त्या घरांत होता, पण मनानें तो विनोदिनीच्या जवळ अगदीं जवळ गेला होता !

त्याला वाटलें आपण दोघें मनानें एक झालों आहोत, आतां शरिरानें एक व्हावयास कितीसा वेळ लागणार ! आणि या कल्पनेनें त्याला अत्यानंद झाला !

आज बऱ्याच कालावधींनंतर त्याचें मन प्रफुल्लित झालें होतें. सांयकाळीं मुंबईला जाण्याकरितां स्टेशनवर जाण्यापूर्वी तो बागेंत गेला. त्या बागेचें सौंदर्य आज कांहींतरी वेगळें असल्यासारखें त्याला वाटलें !

तेथील संगमरवरी पुतळा आपल्याकडें बघून विजयी मुद्रेनें हंसत आहे असा त्याला भास झाला !

' अखेर तुझा पराभव झाला– माणुसकी हेंच जगांतील मोठ्यांत मोठें पुण्य आहे !' असेंच तो आपल्याला बजावीत आहे असें त्याला वाटलें ! स्वत:च्या झालेल्या पराभवाचें त्याला आतां दु:ख होत नव्हते—उलट आनंद झाला होता !

गेल्या खेपेस मुंबईला जातांना आशा–निराशेच्या बादळानें त्याच्या अंत:करणांत थैमान घालून त्याला बेचैन करून सोडलें होतें ! त्या निराशेची जागा आज आशेनें घेतल्यामुळें त्याच्या चित्त-वृत्ती अत्यंत उल्हासित झालेल्या होत्या आणि म्हणूनच जिकडे पहावें तिकडे त्याला आनंदाचें साम्राज्यच पसरलें आहे असें वाटत होतें ! अशा उल्हासित अंत:करणानेंच दुसरें दिवशीं सकाळीं बोरीबंदरवर तो उतरला व तडक एक टॅक्सी करून प्रभाकरानें दिलेल्या पत्त्यावर येऊन पोंचला. अत्यंत अधिरतेनें त्यानें दरवाज्यावर टिचक्या मारल्या व प्रभाकरानें येऊन दरवाजा उघडल्यावर प्रभाकरला विचारून तो विनोदिनीच्या खोलींत शिरला ! त्या दोन जीवांची आज अशा तऱ्हेनें पुनर्भेट झाली होती.

## — १६ —

आणि दुपारीं जेवणें झाल्यावर जेव्हां विनोदिनीनें सर्व आडपडदा दूर करून एकदम मूळ विषयालाच हात घातला तेव्हांच्या जगन्नाथाच्या वृत्तीवरून सर्वच मामला पुन्हां बिघडतो कीं काय अशी शंका निर्माण झाली !

कलेला आपली मुलगी मानावयाची जगन्नाथाची तयारी असेल तरच आपण त्याच्याशीं विवाह करावयास तयार आहोंत असें विनो-दिनीचें म्हणणें होतें. अर्थातच प्रभाकर आणि निर्मला यांची त्याला पूर्णपणें संमती होती !

पण जगन्नाथ? त्याच्या मनाच्या कोपऱ्यांतील अहंकार अजूनही पुरता नष्ट झालेला नव्हता!

आपण कलेशिवाय विनोदिनीचा स्वीकार करावयास तयार आहोंत असें त्यानें स्पष्टपणें सांगितलें. ही त्याची अट विनोदिनीला मान्य करणें अर्थातच शक्य नव्हतें.

'कला जर आपल्याजवळ राहील तर भूतकाळांतील ज्या घटना आपण विसरून पाऊन पुढील संसार सुखाचा करावयाचा असें म्हणतों तें शक्य होणार नाहीं. होऊं नये ती जखम झाली आहे खरी, पण ती तितक्याच निष्ठुरपणानें आपण ती कापून काढली पाहिजे. प्रभाकर आणि निर्मला कलेचा सांभाळ करतीलच' हा जगन्नाथाचा युक्तिवाद तिला भयंकर वाटला. कलेला दूर करावयाचें म्हणजे आपलें हृदयच बाजूला करण्याइतकें अवघड आहे, अशी विनोदिनीची खात्री होती!

आणि हृदय बाजूस काढून मनुष्यप्राणी जगल्याचें कोणी ऐकलें आहे? जगन्नाथाच्या त्या युक्तीवादानें एक क्षणभरच त्या दिवाण-खान्यांत कमालीची शांतता पसरली. क्षणभरानेंच तिच्या डोळ्यांत वीज चमकत असल्याचा त्याला भास झाला. विनोदिनीची तशी ती भयंकर दृष्टी त्यानें पूर्वी कधींही पाहिली नव्हती!

दुसऱ्याच क्षणीं ती म्हणाली, "जगन्नाथ मी मुळींच पाप केलेलें नाहीं आणि क्षणभर तसें गृहीत धरलें तरी त्याचा सूड तूं अशा रितीनें त्या लहानग्या जीवावर कां उगवूं पहातोस"? तिच्या आवाजातील कंप त्याला जाणवला आणि म्हणूनच तिचा थरथरणारा हात त्यानें आपल्या हातांत घेऊन तिला आपल्याजवळ घेतली!

"तूं माझ्याशीं लग्न करशील ना"? जगन्नाथनें तिला विचारलें. 'माझ्याशीं लग्न करणें हें आपलें तूं कर्तव्य समजतोस—पापी माणसाचा उद्धार करण्यासाठीं आपण एक फार मोठा स्वार्थत्याग करीत आहों

ही भावना जोंपर्यंत तुझ्यांतून दूर होत नाही, तोंपर्यंत तुझामाझा विवाह होणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष शरीरानें नसलास तरीं तूं ही मनानें पापीच आहेस." ही विनोदिनीची स्पष्टोक्ती त्याला चांगलीच झोंबली. 'आपण मनानें पापी नाहीं तर काय ? त्या निर्जीव पुतळ्याचें मुद्धां आपण एकदां चुंबन घेतलें तें पाप नव्हे तर काय असे विचार त्याच्या मनांत आल्याशिवाय राहिले नाहींत ! त्यानें त्या विचारांच्या तंद्रींतच विनोदिनीकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत एक प्रकारच्या निश्चयाची झांक त्याला दिसली आणि त्यानें तो दिपून गेला !

पुन्हां त्यानें तिला तोच प्रश्न विचारला आणि तिनेंही तितक्यांच निश्चयानें नकार दिला !

आपल्या मस्तकांतून एक उष्ण फवारा गेल्याचा त्याला भास झाला. पूर्वी असें त्याला कधींही वाटलें नव्हतें. त्या अदृश्य शक्तीनें त्याच्यांतील विचारशक्तीवर विजय मिळविला. पाण्याच्या प्रचंड प्रवाहानें एखादी खवळलेली नदी आपल्या वाटेंतील बांध वगैरे फोडून जितक्या स्वैर वेगानें धावूं लागते तितक्याच स्वैर वेगानें त्याच्या मनांतील आतांपर्यंत दडपून ठेवलेल्या विकारशक्ती सैरावैरा धावूं लागल्या आणि त्या भरांतच—त्या आसक्तींतच त्यानें विनोदिनीला आपल्याजवळ ओढून घेऊन तिच्या ओठांवर आपले ओंठ जोरानें दाबले. त्याच्या ओठाचा उष्ण व वैकारिक स्पर्श विनोदिनीला जाणवल्याशिवाय राहिला नाहीं. तिनें आपल्या हातानें त्याचें तोंड दूर करण्याचा प्रयत्न केला ! तिला तें नको होतें असें नव्हे ! गुरुनाथाच्या चुंबनांत जी भावना होती—जो विकार होता तोच जगन्नाथाच्या चुंबनांत आहे अशी तिची खात्री झाली होती.

क्षणावधीनंतर ती एकमेकांपासून दूर झाली. पण विनोदिनीचा आपल्या विवाहाबाबतचा निश्चय कायम आहे हें त्यानें ओळखलें.

काय करावें आणि कसें करावें हें त्याला सुचेना ! त्याचें अहंकारी मन अद्यापही आपला हट्ट सोडावयास तयार नव्हतें. तो त्याचा अहंकार नष्ट झाल्याशिवाय आपण त्याच्याशीं लग्न करण्यांत फार मोठी चूक होईल अशी तिची खात्री झालेली होती. अशाच स्थितींत कांहीं काळ गेल्याबरही मुख्य प्रश्न तसाच अनिर्णित राहून जगन्नाथ उठून बाहेर गेला !

× × × ×

तो दिवस तसाच निघून गेला. सर्वांचीच मनें अगदीं अस्वस्थ झाली होती. कोणाला कांहींच सुचत नव्हतें !

प्रभाकर आणि निर्मला यांनींही एकमेकांशीं विचारविनिमय केला, पण या प्रश्नाचा निर्णय कसा करावा हें त्याना ठरवितां आलें नाहीं. त्यांना वाटलें जगन्नाथ आणि विनोदिनी या दोन समांतर रेषांचा संयोग कसा होणार !

इकडे विचार करकरून जगन्नाथची मनःस्थितीही फारच केविलवाणी झाली होती ! आपल्या मनाला तो हजारो प्रश्न विचारी, पण त्यापैकीं एकाही प्रश्नाचें समाधानकारक उत्तर त्याला देतां येत नव्हतें. एक आठवडाभर विचार करूनही त्या पेंचांतून आपल्याला मार्ग काढतां येईल अशीं लक्षणें त्याला दिसेनांत !

एके दिवशीं दुपारीं असाच विचार करीत तो आपल्या कॉटवर पडला असतांना एकदम ‘ विनोदिनी आपल्या हातांत आपलें मूल घेऊन उभी आहे असा त्याला भास झाला ! ’

‘ त्या मुलाला आपलें म्हणावयाचें–त्याचें नसलेलें पितृत्व आपण स्वीकारावयाचें ? जग आपल्याला काय म्हणेल ? असें विचारचक्र त्याच्या डोक्यांत त्वादृश्यानें सुरू झालें !’

त्या विचारांतून त्याची दृष्टी त्या लहानग्या जीवावर खिळली !

जणूं तें त्याला म्हणत होतें, ‘ तूं आपल्या विचारांचा–अहंकाराचा सूड माझ्यावर कां उगवतोस ’ !

त्या बालकाकडे बघवेना म्हणून त्यानें आपले डोळे झांकून घेतलें ! तथापि, त्या बालकाच्या इवल्याश्या डोळ्यांतील ती कमालाची आर्द्रता त्यांच्या डोळ्यापुढून कांहीं केल्या हलेना !

‘ त्या बालकाला जन्म देतांना त्याच्या मातेनें किती कष्ट सहन केलें असतील ? नुसतें शारीरिक कष्टच नव्हेत तर मानसिकही ? ’

आणि अशा त्या पवित्र मातेला–तिच्या बालकाला–केवळ दुर्दैवानें पोरक्या झालेल्या त्या बालकाला झिडकारण्याचा–तिरस्कारानें दूर लोटण्याचा आपल्याला काय अधिकार आहे, असें त्याचें मन त्याला छेडूं लागलें !

तें बालक आपल्याकडे येण्याकरतां–आपल्या चिमुकल्या हातानें आपल्या गळ्याला मिठी मारण्याकरतां, विनोदिनीच्या हातांतून आपल्याकडे झेप टाकीत आहे असा त्याला भास झाला !

त्या प्रसंगानें त्याचे डोळे साफ उघडले ! विचारांतून निर्माण झालेल्या वैकारिक भावनांनीं–निसर्गनिर्मित तारुण्यसुलभ भावनांनीं त्याच्यांतील अहंभाव–पापपुण्याच्या खोट्या कल्पना या पूर्ण नाहींशा झाल्या !

त्यानें आपल्या मनाशीं एक ठाम निश्चय केला आणि त्या निश्चयाच्या आवेगाच्या भरांत तो उठला व एकदम विनोदिनीच्या खोलींत गेला !

विचारांनीं मनाला ग्लानी आल्यामुळें विनोदिनीला झोपेची गुंगी आली होती. हलक्या हातानें त्यानें तिच्या पायाशीं पडलेली चादर तिच्या आंगावर घातली.

तिच्या शेजारींच तिची कला आढ्याकडे दृष्टी लावून पडली होती ! तिनें आपलें लहानगे हात आपल्या छातीवर ठेवले होते !

तिच्या त्या इवल्याशा डोळ्यांत त्याला जगांतील सर्व पावित्र्य वास करीत आहे असें वाटलें !

पहातां पहातां कला आपल्याशींच हंसत आहे असें त्याला वाटलें ! ' एका माणसाचा कसा पराभव झाला ' हाच टोमणा जणूं तिच्या हास्यांत आहे असें त्याच्या मनानें घेतलें !

त्यानें एकदम कलेला उचलून आपल्या हृदयाशीं धरलें व तिचा एक गोडसा पापा घेतला ! छोटी कला आणखींच हसूं लागली ! तिच्या हास्यांत जगन्नाथानेंही आपला सूर मिळविला आणि त्या सर्व गडबडीनें विनोदिनी एकदम जागीं झाली. ' जगन्नाथाच्या हातांत कला आहे व ती हंसत आहे जगन्नाथ तिच्या चिमुकल्या गालाचे भराभर मुके घेत आहे ' हें दृश्य तिनें पाहिलें !

आपण हें स्वप्न तर पहात नाहींना अशी शंका तिला आली ! तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना !

आणि ' आपण पहातों तें स्वप्न नव्हें अगदीं सत्य आहे ' अशी जेव्हां तिची खात्री पटली तेव्हां तिला अत्यानंद झाला !

तिनें कांहीं विचारण्याच्या अगोदरच जगन्नाथ कलेला घेऊनच तिच्या शेजारीं कॉटवर बसला. त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला. त्याला जें बोलावयाचें होतें त्याची जाणीव त्याच्या डोळ्यांत तिला दिसली !

त्या जाणीवेनें आपण कृतार्थ झालों असें तिला वाटलें !

' विनू—लाडके ' जगन्नाथ कलेला कॉटवर ठेवून विनोदिनीला-जवळ घेत म्हणाला, " या तुझ्या कलेनें माझ्यांतील उरलासुरला अहंकार आज पुरा नष्ट केला आहे. जगांतील कोणतीही घटना सत्यार्थानें सर्वस्वीं पाप नाहीं अशी माझी खात्री पटली आहे. त्यांतून कुमारिकेचें मातृत्व ही समर्थन करण्यासारखी घटना नसली तरी तिच्याकडे तिरस्कारानें—असहिष्णु वृत्तीनें पहाण्यासारखीही ती नाहीं हें

मला कळून चुकलें आहे. तुझ्यामाझ्यांतील शारीरिक अंतर आज दूर झालें आहे आणि ज्या वैचारिक अंतराकरतां तूं मला सोडून इतक्या दूरवर आलीस. शारीरिक कष्ट मोसलेस, तें वैचारिक अंतरही आतां नाहींसें झालें आहे. आपण आतां शरीरानें त्याचप्रमाणें मनानेंही एक झालों आहोत." असें म्हणून त्यानें आपल्या हातांतील आंगठी काढून तिच्या बोटांत घातली !

'तथास्तू' प्रभाकर व निर्मला आंत येतां येतां त्यांनीं आशीर्वाद दिला. त्यांना आंत आलेली पहातांच विनोदिनी झटकन बाजूला सरकली !

छोटी कला गालांतल्या गालांत हंसत होती ! काय ही मोठी माणसें लबाड असतात' हाच भाव जणूं तिच्या त्या हास्यांत होता !

'प्रभाकर' त्याला उद्देशून पण विनोदिनीकडे आपली दृष्टि रोखीत जगन्नाथ म्हणाला, "अखेर तुझ्याच विचारसरणीचा विजय झाला म्हणून तुला आनंद होणें स्वाभाविक आहे. पण मलाही माझ्या झालेल्या पराभवानें मुळींच दुःख वाटत नाहीं. माझा जर विजय झाला असतां तर मात्र मी जन्माचा दुःखी झालों असतों. पराभवामुळेंही कधीं सर्वसुख लाभतें तें असें"!

त्या दोघांच्या एकांतांत आपला व्यत्यय नको म्हणून प्रभाकर खोलीबाहेर पडला. निर्मलेनें जातांना कलेलाही आपल्याबरोबर नेलें !

झालेल्या त्या हर्षोत्फुल्ल घटनेनें दोघांनाही इतका आनंद झाला होता कीं, तशा त्या एकांतावस्थेंतही कोणाच्याच तोंडांतून लौकर शब्द बाहेर पडेनात !

शेवटीं त्या स्तब्धतेचा जगन्नाथनेंच भंग केला !

तिच्या कमरेभोंवतीं आपला हात लपेटून त्यानें तिला आपल्या जवळ ओढलें—हृदयाशीं अगदीं घट्ट धरलें ! त्या अलिंगनांत आज-

पर्यंत कधींही अनुभवावयास न मिळालेला विलक्षण आनंद त्याला झाला होता !

त्या आनंदाच्या आवेगात त्यानें तिचें दीर्घकालपर्यंत चुंबन घेतलें !

तशा त्या आनंदावलेल्या स्थितींतून कांहीं क्षणानें तीं दोघें विलग झाली !

विनोदिनीचे डोळे आनंदानें पाणावले होते !

आपण पुष्कळ बोलावें—नुसतें बोलतच रहावें असें तिला वाटत होतें, पण प्रत्यक्ष मात्र तिच्या तोंडांतून एक शब्दही बाहेर पडला नाहीं !

तिनें कांहीं बोलावें असें जगन्नाथानें शिल्लकच ठेवलें नव्हतें ! त्या आनंदानें भारवलेल्या मन:स्थितींतच विनोदिनी बाहेर गेली व निर्मलेच्या हातून कलेला घेऊन तिनें तिचें लागोपाठ अनेक मुके घेतले !

हसतांना कलेच्या गालांवर पडलेल्या खळींतून तिच्या हृदयांतील सर्व हर्ष बाहेर पडूं पहातोय कीं काय असें तिला वाटलें !

दूरवर कोठें तरी !

'प्रेम म्हणजे दो जिवाची एकता'

हे काव्यचरण तिला ऐकूं आले ! तिनें अभिमानानें जगन्नाथकडे दृष्टी फिरविली !

विश्वप्राप्तीचा आनंद विनोदिनीच्या त्या टपोऱ्या डोळ्यांत सामावलेल्याचा त्याला भास झाला !

**समाप्त.**

**लेखन काल**

*२५ सप्टेंबर ते १६ आक्टोबर १९४३.*